नव्हता. अखेर सद्गुरू हा उपाय त्यांच्या चित्तात ठसला व त्यांनी ईश्वरनिष्ठेचे रहस्य समजावून देणारे ज्ञान संपादून या रहस्याच्या सिद्धीची कर्तव्ये माणसाने आचरावी या सिद्धांताच्या उपदेशाला प्रारंभ केला. नानकांना तीर्थयात्रेचे महत्त्व वाटत नव्हते; पण त्यांच्या संसर्गाची स्थळे आज तीर्थत्व पावली आहेत. देवाची पूजाअर्चा जीवनसाफल्याला उपयोगी नाहीत, अशी वचने त्यांच्या उपदेशात शेकड्यांनी असली तरी ते स्वतः आपल्या अनुयायांच्याच पूजेचा विषय बनले. अनुयायित्वाची दीक्षा चरणतीर्थ पाजून देण्याचा प्रघात त्यांच्या हयातीतच निर्माण झाला होता. त्यांच्या जागी गुरूच्या पसंतीने किंवा नातेवाईक म्हणून जे आले, त्यांनी नानकांच्या फकीरीवर तिळांजलि सोडून राजे-रजवाड्याप्रमाणे रहायला सुरवात केली, आणि कित्येक तर राजेच बनले. रणजीतसिंग हा त्यातला सर्वात मोठा राजा प्रसिद्धच आहे.

नानकांनी हिंदू धर्माचा जीर्णोद्धार हाती घेतला त्याच्यामागे मोठा इतिहास आहे– त्यांना अमान्य असलेल्या गोष्टीचा पाढा वर वाचला आहे. नानकापूर्वी होऊन गेलेल्या संतमहंतांनी नानकांप्रमाणेच सदर गोष्टीबद्दल अमान्यता दर्शविली आहे. नानकांनी संस्कृताला टाळा देऊन लोकांच्या बोलभाषेत आपला उपदेश केला याचे पुष्कळानी विशेष कौतुक केले. पण हे कौतुक नानकांआधीच्या अनेक संतांच्या कामगिरीत दिसून येईल. इस्लामच्या आक्रमणाने देशातल्या ज्या प्रदेशातल्या लोकहितार्थी विचारवंतांनी भागवत-धर्माची कास धरून परमार्थाच्या जीर्णोद्धाराला हात घातला त्या सर्वांनी प्रादेशिक प्राकृत भाषांचा उपयोग केल्याचे प्रसिद्ध आहे. देशाच्या दक्षिण विभागांतील सारे भक्त कवि, बंगालचे चैतन्य, काशीचे कबीर आणि रामानंद परंपरेचे इतर सत्पुरुष यांचे वाङ्मय त्या त्या विभागातील लोकभाषेत आहे. नानकांनी तोच मार्ग अनुसरला व पंजाबी भाषेला प्रौढत्व आणून तिच्या विकासाचा मार्ग मोकळा केला.

पूर्व संताच्या प्रयत्नातले दोष आपल्या शिकवणीत नानकांनी घुसू दिले नाहीत, असा एक विशेष नानकांच्या पदरी बांधला जातो व त्याच्या जोरावर असे ठासून सांगण्यात येते की नानकाच्या शिकवणीचे वळण स्वतंत्र व अपूर्व आहे. नानकांच्या शिकवणीचे सांप्रदायिक स्थित्यंतर अपूर्व आहे, परंतु शिकवणीत अपूर्वता नाही. त्यांची सगळी शिकवण हिंदूच्या पारमार्थिक सिद्धान्तांनी ओतप्रोत भरलेली आहे. ॐकार ब्रह्म, परब्रह्म माया, नामजपाचे माहात्म्य, कामक्रोधादि मनोविकार, अजपाजप, अनाहतध्वनी, सोहं, नादबिंदु निर्वाण, तुर्या, अहंकार, पुनर्जन्म, अवतार, चौऱ्यांयशी लक्ष योनी, चार वाणी चार खाणी इत्यादि मुख्य मुख्य हिंदु कल्पना त्यांच्या वाङ्मयात घोळून घोळून आलेल्या आहेत. एका इंग्रज लेखकाने सुचविले आहे की या कल्पना त्यांना मान्य होत्या असे समजू नये; त्या सामान्य लोकांच्या हाडीमाशी खिळलेल्या होत्या म्हणून आपले विचार लोकांच्या गळी उतरविण्यासाठी त्यांनी सदर कल्पना दृष्टान्ताप्रमाणे वापरल्या. नानकांच्या वाङ्मयाचे परिशीलन करणारांना ही मखलाशी पटणार नाही. नानकांचा या कल्पनांवर हिंदूप्रमाणेच विश्वास होता असे यासंबंधात पूर्वग्रह नसलेल्याना अभ्यासांती कबूल करावे लागेल. नानकांच्या वाङ्मयात हरि, राम, दामोदर, श्रीधर, गोविंद, गोपाळ, मुरारि ही विष्णूची नावे पुष्कळदा आलेली आहेत. पण दुसऱ्या एका इंग्रजाने नानकवाणीच्या इंग्रजी भाषांतरात त्यांना हाकलून त्यांची जागा 'गॉड' (ईश्वर) या शब्दाला दिली आहे. अगदी नाइलाज होईल तेथेच मूळच्या शब्दाला त्याने थारा दिला आहे. हे इंग्रजी भाषांतर वाचणाराला वाटेल की रामकृष्ण, हरि, गोविंद, या शब्दांचा नानकांनी आपल्या उपदेशाला चुकूनसुद्धा विटाळ होऊ दिलेला नाही. इंग्रजांचे हिंदी राजकारण शिखांना हिंदूतून फोडण्याचा प्रयत्न करीत होते व त्यासाठी नानकांच्या शिकवणीचे भिन्नत्व दाखविणे हे इंग्रजांना अवश्य वाटावे यात नवल नाही.

इंग्रजाला शिखांविषयी विशेष जिव्हाळा वाटण्याचे एक कारण म्हणजे नववे गुरु तेग बहादुर व दहावे गुरु गोविंदसिंग यांनी शीख-इंग्रज मिलाफाची वर्तविलेली भाकिते हे आहे. तेगबहादुर औरंगजेबाच्या कैदखान्यात असता एकदा गच्चीवरून दक्षिण दिशेकडे एकाग्रतेने पाहात होते. त्याच दिशेला बादशहाचा जनानखाना होता. त्याकडे तेगबहादुरांची नजर असल्याचा बादशहाला संशय येऊन त्याने सदर गुरूला प्रश्न विचारले. गुरूंनी उत्तर दिले : 'मी जनाना पहात








नव्हतो. दक्षिणेकडे पहात होतो. तिकडे इंग्रज वाढत आहे. तो लवकरच तुझ्या साम्राज्याचा शिखांच्या साह्याने नाश करील, या भविष्याचे मी दक्षिणेकडे नजर लावून चिंतन करीत होतो.' यानंतर तेगबहादुरांचा शिरच्छेद करण्यात आला. गुरु गोविंदसिंहानी या भविष्याला दुजोरा दिला म्हणून गुरुवाणीचे इंग्रजी भाषांतर करणाऱ्या मेकालिफने आपल्या भाषांतराच्या प्रस्तावनेत मुद्दाम लिहिले आहे– "हे भाकीत एकेश्वरवाद, खोट्या कल्पनांचा त्याग, खानपानाचे निर्बंध. यामुळे शीख समाज कमालीचा शूर व ब्रिटिशाविषयी पराकाष्ठेचा राजनिष्ठ बनलेला आढळतो. सदर भाकिताच्या स्फूर्तीने १८५७ साली दिल्लीवर इंग्रजांनी हल्ला केला तेव्हा इंग्रजांच्या बाजूने शीख शिपाई लढले." शिखांच्या राजनिष्ठेबद्दल दुसऱ्या कित्येक इंग्रज लेखकांनी असाच अभिप्राय व्यक्त केला आहे. मेकालिफने शीख हे हिंदु नव्हत, हे सिद्ध करण्यासाठी आणखी एक जो पुराव्याचा पाल्हाळ केला आहे, तो वरील मजकुराच्या धोरणाचा आहे, तो खरा नाही, पण त्याचा गुरु नानकांच्या उपदेशाशी संबंध नसल्यामुळे त्याचा येथे विचार करण्याची आवश्यकता नाही. पूर्वोक्त भाकिते प्रक्षिप्त होत, असे अर्वाचीन विद्वानांचे मत दिसून येते.

नानकांच्या शिकवणीतील हिंदु सिद्धांतांचा हिंदूच्याहून वेगळ्या अर्थाने ऊहापोह करण्याची इंग्रजांची प्रवृत्ती– तीच शीख धर्माचा अभ्यास करणाऱ्या हिंदु विद्वानांनी उचलली असल्यामुळे मुद्दाम–पारखण्याची गरज वाटते. एकच काहीसे क्षुल्लक दिसणारे उदाहरण पुरेसे होईल. ते 'माया' शब्दाचे आहे. अलीकडे एकट्या नानकांच्या चरित्राचे आणि विचारसरणीचे विवेचन करणारे एक पुस्तक प्रसिद्ध झाले आहे. त्याच्या दुसऱ्या भागात नानकांच्या काही सिद्धांतांची व्यवस्था लावण्याचा जो प्रयत्न आढळतो, त्यात मायेच्या अर्थाची छाननी करताना नानकांनी तो शब्द द्रव्याच्या अर्थाने स्वीकारल्याचा निर्देश असून हा अर्थ खास नानकांचा अशी कल्पना लेखकांनी मांडली आहे. माया म्हणजे द्रव्य ही कल्पना सगळ्या उत्तर भारतीय भाषांना परिचित आहे. कोणी एखादा इसम जादा दिमाखाने वागताना दिसल्यास त्याच्यापाशी बरीच माया असावी, असे त्याविषयी लोक बोलतात, हे मुद्दाम सांगायला नको. माया म्हणजे द्रव्य, ही कल्पना नानकांपूर्वीच्या वाङ्मयातून दाखविता येईल. मायेचा मिथ्या हा अर्थ नानकांना मान्य नव्हता, याचाही खल प्रस्तुत इंग्रज लेखकाने केला आहे. जग मिथ्या ( खोटे ) हे शब्द ज्या समजुतीने वेदांतामध्ये वापरले जातात त्या समजुतीचे बीज पाहिल्यास 'खोटे' या अर्थाची मर्यादा ध्यानात येईल. जे आज आहे ते उद्या नाहीसे होईल, या स्थितीला वेदान्त 'माया' शब्दाने ओळखतो. जेवढे नश्वर त्या सर्वांचा मायेत समावेश होतो, पण व्यवहारासाठी नश्वराचे त्या त्या वेळचे अस्तित्व खरे मानूनच चालावे लागते, हा मुद्दा वेदांताने डावललेला नाही. नानकांच्या उपदेशात हा मुद्दा बऱ्याच ठिकाणी दृष्टीस पडतो. नानकांची छंदोबद्ध वचने सहज किंवा प्रसंगस्फूर्त आहेत. प्लेटो किंवा शंकराचार्य यांच्यासारखे नानक हे सुसंगत तत्त्वज्ञानाचे प्रणेते नव्हते. ते एक भक्तिमार्गी संत होते. माणसाच्या व्यवहारातले दोष किंवा इतर काही आत्मघातकी विपरीत दिसताच मनात जे हितवाचक तरंग उठतील ते तळमळीच्या उचित शब्दांनी व्यक्त करावयाचे ही संतमहंताची रीतच नानकांनी अनुसरली आहे. त्यांचे गुरुमुख व मनमुख हे दोन शब्द मनुष्याचे दोन वर्ग सुचवितात. गुरूच्या उपदेशाचे तंतोतंत आचरण करणारे ते गुरुमुख आणि मनाच्या लहरीप्रमाणे बऱ्यावाइटाचा विचार सोडून वागणारे ते मनमुख. मनमुख अधोगतीस जातात व गुरुमुख ईश्वराशी एकरूप होतात.

'१ ओं सतिनामु करना पुरखु निरभउ निरवैरु अकाल मूरति अजूनी सैभं गुर प्रसादि'

हा शीख धर्माचा मूळमंत्र असून त्याचा अर्थ मूळ संस्कृत शब्दांच्या द्वारे स्पष्ट होतो. एकाचा आकडा ब्रह्म ( ईश्वर ) एकमेवाद्वितीय असल्याचा बोधक आहे. ओं ( ॐकार स्वरूप ) अर्थात शब्द अथवा वाणी. सतिनामु– सत्य नावाचा, कर्ता (आदि) पुरुष, निर्भय, निर्वैर, त्याची मूर्ति त्रिकालातीत आहे ( अकाल मूरति ) अयोनि ( अजूनि ) स्वयंभू (सैभं) आणि तो गुरूच्या प्रसादाने प्राप्त होतो. या मंत्रामध्ये हिंदूंच्या तत्त्वज्ञानाला अपरिचित असा एकही शब्द नाही. सतनाम–सत्य नावाचा. या शब्दाचा










उलगडा करून घेताना महात्मा गांधीजीप्रमाणे गुरु नानक हे सत्यालाच ईश्वर मानीत होते, असा भास उत्पन्न होतो. एरवी 'सत्य नावाचा' या अर्थाला विविध प्रश्नांचे फाटे फुटतात. नाव कोणते व ते सत्य कसे व कोणते? हा प्रश्न सकृद्दर्शनीच उद्भवतो. प्रत्येक भाषेत ईश्वरवाचक शब्द भिन्न आहेत. त्यातला कोणता शब्द खरा धरायचा. नानकांनी राम, हरि, हेच शब्द स्वीकारले आहेत. पुरुष–पुरि शयानः – देहाच्या पुरीत वसणारा, असे विद्वानांचे याबद्दल जुनेच स्पष्टीकरण आहे. निर्भय, निर्वैर, यात कठिणपणा नाही. अकाल पुढील मूर्ती शब्द घोटाळ्यात टाकतो. निराकाराच्या (शीख-निरंकार) आग्रहाला 'मूर्ती' कशी परवडली, या प्रश्नाला उत्तर हेच की वाणीच्या पलीकडील ईश्वराची वाणीच्या द्वारेच ओळख करून द्यावयाची असल्याने वाणीतल्याच एखाद्या शब्दाला शरण जावे लागते. निराकाराच्या आड येणाऱ्या या मूर्तीचा आकार, रूप इत्यादि ऐवजी निराळा अर्थ लावण्याची खटपट क्वचित् दृष्टीस पडते. पण ती अर्थव्युत्पत्तीला जुळत नाही. अयोनि–ज्याला योनी नाही. साऱ्या सृष्ट पदार्थांचे जन्मस्थान सांगता येते. ईश्वराविषयी तसे म्हणता येत नाही म्हणून तो अयोनी-स्वयंभूचा खुलासा नको. गुरूच्या कृपेने ईश्वर लाभतो, या गुरुप्रसादीच्या अर्थाबद्दल गुरु म्हणजे ईश्वरच असे मानणारा एक वर्ग आहे. हा मंत्र नानकांच्या एकंदर शिकवणीचे सार होय, अशी समजूत आहे व तिच्या कसोटीवर ती शिकवण तपासावी, असे सांगण्यात येते. येथे त्या कसोटीचा उपयोग करावयाचा नसून प्रस्तुत मंत्राचे हिंदूंच्या प्राचीन परमार्थातले असल्याचे निदर्शनास आणावयाचे आहेत.

येथवर शीखांचा परमार्थ हिंदूपेक्षा भिन्न या कल्पनांचा समाचार घेतला व त्यावरून अप्रत्यक्षपणे नानकाच्या शिकवणीचे स्वरूप ध्यानात येण्याला हरकत नाही. नानकांचा कटाक्ष दिखाऊ बाह्याचाराच्या ढोंगावर होता. एकदा सूतक विषयावर त्यांनी कविता रचली. कोणी जन्मास आले किंवा मेले म्हणजे सोयरसुतक किंवा अशौच पाळतात–शिवाशीव संभाळतात; पण त्यांत, मुळीच तथ्य नाही त्या ऐवजी डोळ्यांनी परस्त्री-परधनाकडे अभिलाषदृष्टीने पाहाण्याचे टाकल्यास ते खरे शौच म्हणता येईल. हाच नियम इतर ज्ञानेंद्रियावर लादल्यास त्या योगाने चारित्र्य सुधारून खरे श्रेय पदरी पडेल, असा त्या कवितेचा भावार्थ आहे. कामक्रोधादि दुष्ट विकारापासून अलिप्त, निर्मल ठेवणे, ही मनाची उन्नति साधावी. आर्तांना साह्य करावे, एकमेकांना मदत करण्याच्या सेवेला नेहमी तत्पर असावे; विनय, नम्रता, मृदु भाषण, सत्संगती धरावी, निर्भय, निर्वैर हेही ईश्वर-विषयक मूळ मंत्रातले गुण जोपासून व त्याप्रमाणे वागून जितके ईश्वराजवळ जाता येईल तितके जावे. नामस्मरण श्वासागणिक जागृत असावे. टिळे, माळा, वेश, मूर्ती, देवळे, तीर्थे ही खऱ्या परमार्थसिद्धीला मुळीच उपयोगी नाहीत. भागवतमार्गाच्या यासारख्या कर्तव्या-कर्तव्यावर नानकांचा सगळा भर आहे, याप्रमाणे परीक्षण केल्यास भागवतधर्माची नानकपंथ ही पंजाबात उदयास येऊन वाढलेली शाखा आहे, असे वाटल्या-शिवाय राहात नाही. दक्षिणेत व राजस्थान गुजरात येथे त्या नानकांच्या आधी भागवत धर्माचा प्रभाव दिसतो. उत्तर भारतात रामानंदानी देशकालानुसार भागवतधर्माचा जो प्रसार केला त्यांत कबीराचे स्थान फार मोठे आहे व कबीरांची वचने ज्या अर्थी गुरु नानक पंथाच्या उपदेशग्रंथात आधारादाखल समावलेली आहेत, त्या अर्थी त्यांचे पर्यायाने भागवतधर्माचे ऋण नमूद करणे शीख पंथाला अवश्य वाटले. नानकांनी स्वतंत्र विचाराला महत्त्व देऊन विचारांच्या उसन-वारीचा तीव्र निषेध एका ठिकाणी सुचविला असल्या-मुळे त्याचा उपदेश त्यांच्या चिंतन मननातून स्वतंत्रपणे विकास पावला, यात संशय नाही. पण त्यांच्या विचार-स्वातंत्र्याची मर्यादासुद्धा ध्यानात ठेवायला पाहिजे. माणसाच्या स्वभावात व रूपात आईबापांच्या स्वभा-वाच्या व रूपाच्या छटा उतरतात, तसाच थोर पुरुषांच्या उपदेशाचा प्रकार गृहीत केल्यावाचून गत्यंतर नाही. नानकांनी आपल्या उपदेशाने पंजाबातील हिंदु समाज इस्लामधर्माच्या तडाक्यातून सोडविला हे त्यांचे आपल्या देशावर आणि समाजावर झालेले उपकार चिरस्मरणीय आहेत.

गुरु नानक सत्तराव्या वर्षी १५३८–१५३९ मध्ये करतारपुर येथे निर्वाण पद पावले. त्यांच्या उघड गुरुत्वाचा काळ सुमारे साडे सात वर्षाचा होता. अश्विन वद्य १० हा त्यांच्या निर्याणाचा दिवस आहे. पाचव्या गुरूचा जहांगीर







बादशहान छळ केला व तो त्याच्या मृत्यूस कारण झाला हे कारण धार्मिक नव्हते. आपसातल्या मानापमानाच्या हेव्यादाव्याचे होत. त्यानंतर धार्मिक छळाला प्रारंभ होऊन त्याच्या प्रतिकारार्थ शीख शिपाईगिरीत शिरले. मुसलमान सत्ताधारी व शीख यांच्यात कटकटी वाढत जाऊन हजारो शिखांची मुसलमानांनी पुनः पुनः कत्तल उडविली, तरी शीख दबले नाहीत. शेवटी गुरु गोविंद सिंहांनी शिखांना लष्करी वळण लावले. तरी शिखांच्या कत्तली चालूच होत्या. शिखांच्या इतका भयंकर संहारक छळ देशातील दुसऱ्या कोणत्याही धर्मपंथाला सोसावा लागलेला नाही. तथापि शीख डगमगले नाहीत. जो जो हानि अधिक तो तो धैर्य, शौर्य, उत्साह अधिक असा त्यांचा इतिहास वाचताना अनुभव येतो. इ. स. १७६५ नंतर त्यांचा छळ संपला. पंजाबात व अन्यत्र ठिकठिकाणी त्यांची राज्ये अस्तित्वात आली. अठराव्या शतकाच्या प्रारंभी रणजितसिंगाने वायव्य हद्दीपर्यंत सर्व पंजाबावर आपले वर्चस्व स्थापन केले. पण शिखांच्या राजवटीत धर्मासाठी मुसलमानाचा छळ झाल्याचे एकही उदाहरण सांपडले नाही, हे त्यांच्या राजकीय इतिहासाचे मोठे उज्ज्वल भूषण ठरते.



---











लेखक मानवेंद्रनाथ रॉय : अनु. बा. रं. सुंठणकर

# विज्ञान आणि तत्त्वज्ञान

## ( २ )

नव्या वास्तवशास्त्राच्या जगाचे स्वरूप तरी काय आहे? जुन्या वास्तवशास्त्राच्या जगात आणि या जगात फरक कोणता?

जुन्या वास्तवशास्त्राच्या जगाचे चित्र हे असे आहे : जडद्रव्य अविभाज्य कणांचे बनलेले असते आणि प्रत्येक कणाला स्थिर असे वस्तुमान असते. हे कण चिरकाल टिकतात. प्रत्येक कण कालाच्या प्रत्येक क्षणी अवकाशात निश्चित बिंदु व्यापत असतो. प्रत्येक कण इतर दुसऱ्या कणावर दाब घालीत असतो आणि त्याचा परिणाम म्हणून प्रवेग (acceleration) निर्माण होतो. म्हणजेच कण आपल्या सरळ मार्गापासून विचलित होतात. प्रवेग हा जड पदार्थांच्या वस्तुमानाशी व्यस्त प्रमाणात असतो. तारे, ग्रह, दगड, झाडे, प्राणी, मानव इ. सर्व भौतिक पद्धति या कमी अधिक प्रमाणात अविभाज्य जड कणांच्या गुंतागुंतीच्या संयोगाने बनलेल्या असतात. हे कण दिक्कालात सातत्याने अस्तित्वात असतात आणि ठराविक काटेकोर नियमानुसार परस्परावर परिणाम करीत असतात.

नव्या वास्तवशास्त्राच्या जगाची घडण प्रोटॉन आणि इलेक्ट्रॉन यानी बनलेली आहे. हे जुन्या वास्तवशास्त्राच्या स्थूल कणांचे– अणूंचे घटकावयव असतात. त्यांचे घटकावयव या नात्याने प्रोटॉन आणि इलेक्ट्रॉन या जडवस्तु असणे क्रमप्राप्त आहे ते, विशेषतः त्यातील इलेक्ट्रॉन, हे अधिक मूलभूत घटक असण्याचा संभव आहे. ते जुन्या वास्तवशास्त्रीय कणासारखे नसतात. कारण त्याना दिक्कालात सातत्य असल्याचे दिसून येत नाही. आणि सातत्याच्या अभावामुळे त्यांच्यात होणाऱ्या आंतरक्रिया ठराविक नियमांनी नियमित होतात असे निश्चितपणे सांगणे शक्य नाही.

उघडच हा फरक लक्षात घेण्यासारखा– नव्हे मूलभूत दिसतो. भारयुक्त (pondarable) जड आता राहिले नाही. नववास्तवशास्त्राचे जग हे अतिसूक्ष्म द्रव्याचे बनले असून जडद्रव्य आणि ऊर्जा (energy) यांच्या सीमारेषेवर ते वावरत आहे. या अनिश्चित द्रव्याच्या प्रत्यक्ष घटकाना अवकाशात निश्चित स्थान आणि कालात सातत्य नसल्यामुळे नियतिवादाला ते जुमानत नाहीत असे दिसते. नियतिवाद लोप पावला, म्हणजे त्या बरोबर विश्वाच्या यांत्रिकतेचे संकल्पनही लोप पावते. आणि या सगळयावर ताण म्हणजे दिक् आणि काल यांच्या संकल्पनातही क्रांतिकारक बदल घडून आला आहे. केवल अवकाश आणि कालाचा सतत ओघ हेही आता लयाला गेले आहेत. दोन पदार्थातील अवकाशाचा आणि कालाचा वेगळेपणा हा सगळया निरीक्षकांच्या बाबतीत एकच नसतो. जितके आम्ही खोलात शिरू, तितके चित्र अधिक घोटाळयात टाकते. अवकाश हा वक्र आहे. कालाला स्वतंत्र अस्तित्व नसते. काल अवकाशात मिसळून गेला आहे. खरोखरीच अवकाश, काल आणि जडद्रव्य ही चतुष्परिमित अखंडतेत विलीन झाली आहेत. घटना घडतात त्या या अखंडतेतच.

वास्तवशास्त्राच्या या नव्या जगातून ईथरची हकालपट्टी झाली आहे. हीच अप्रतिष्ठा विश्वाचा जुना घटक जी न्यूटनची "गुरुत्वाकर्षण शक्ती' तिच्या नशिबी आली आहे. सगळयात गोंधळ उडविणारी गोष्ट म्हणजे ऊर्जेच्या प्रवाहात सातत्य नसते हा शोध होय. तिची रचना अणिक असते. पुंज–आविष्काराने (quantum phenomenon) आतापर्यंत आधुनिक वास्तवशास्त्रीय ज्ञानाचा समग्र समुच्चय जुन्या वास्तवशास्त्राशी सातत्य राखून एका नव्या पद्धतीत एकत्र गोवण्याचे सारे प्रयत्न धुडकावून लावले आहेत. पुंज–आविष्कार जुन्या वास्तवशास्त्रीय कल्पनांशी जुळणार नाही, इतकेच नव्हे तर तो सापेक्षतावादालासुद्धा विरोधी आहे. सापेक्षतावाद वैश्विक यंत्रणेच्या मुळाशी असणारे आणि सर्व वैश्विक घटनांच्या मध्ये वावरणारे सातत्य ठळकपणे दर्शवितो; तर पुंज–आविष्कार सातत्यात खंड पाडतो.








या गोंधळात टाकणाऱ्या गोष्टींच्या योगाने नव्या वास्तवशास्त्राने गतकालातील धोपट कल्पना त्याज्य ठरविल्या आहेत. त्याने ढोबळ, यांत्रिक, नियतिवादी अशा जडवादी तत्त्वाचे खंडन केले आहे. आणि विज्ञानाच्या पायावर धर्माचे पुनरुत्थान करण्यासाठी जगाच्या गूढवादी दृष्टीची वाट मोकळी केली आहे, या प्रतिवादाला पुष्टी देण्याकरिता जगाचे एक अतिशय रहस्यमय चित्र उभे करता येणे सहज शक्य झाले आहे.

तथापि या नववास्तवशास्त्रात फार मोठे नवे असे काही नाही. त्या शास्त्राकडे बारकाईने पाहिले म्हणजे जुनेच दोस्त नव्या वेषात अवतरलेले आढळून येतात. अर्थात जुन्या वास्तवशास्त्राच्या उपपत्तींच्या मानाने नववास्तवशास्त्रीय उपपत्तीनी प्रचंड प्रगति गाठल्याचे दिसून येते. या अर्थाने त्या खचित नव्या आहेत. गेल्या तीनचार दशकातील वास्तवशास्त्रीय शोधांचा परिणाम म्हणून आमचे जगाचे ज्ञान स्थूलदृष्ट्या तसेच सूक्ष्मदृष्ट्या आश्चर्यकारक रीतीने वाढले आहे. परंतु नव्या उपपत्ति केवळ जुन्या उपपत्तींचे सातत्य पुढे चालवित असतात. जुन्या उपपत्तींच्या पायावरच त्या रचल्या जातात. दोन्ही परस्पराना वर्ज्य नसतात. जुन्या उपपत्ति चुकीच्या म्हणून टाकून दिल्या जात नाहीत. जुन्या उपपत्तीना अनुसरून चालविलेल्या संशोधनाच्या मार्गक्रमणात गोळा झालेल्या न्यासाच्या ( data ) प्रकाशात त्या उपपत्ती सुधारण्यात आल्या, बदलल्या गेल्या, शुद्ध करण्यात आल्या आणि विस्तारल्या गेल्या.

अगदी अलिकडच्या वास्तवशास्त्रीय शोधानी जुन्या उपपत्ति चुकीच्या ठरविल्या आहेत असे म्हणण्याच्या चालीला विरोध दर्शवून प्रा. फ्रेडरिक सॉडी आपल्या "Science and Life" या पुस्तकात म्हणतो :

"प्रायोगिक विज्ञानांच्या शोधांच्या बाबतीत शाश्वततेचा जो विशिष्ट गुण आहे, त्याच्यावर नेहमीच विश्वास ठेवला जातो असे नाही. प्रायोगिक विज्ञानात पडलेली महत्वाची भर, मग ती रॉबर्ट बॉयलच्या काळातील असो वा काल पडलेली असो, कधीही व्यर्थ जात नाही. दृष्टिकोण बदलतील; प्रायोगिक ज्ञानाचे स्पष्टीकरण आणि विवरण करणाऱ्या उपपत्ति बाल्य, तारुण्य आणि वृद्धत्व या अवस्थातून जातील; पण प्रायोगिक तथ्याभोवती उभी केलेली कल्पनांची चौकट इतकी व्यवस्थित आणि पक्की घातली जाते की, ती कोसळून पडण्याची भीति नसते. आजच्याप्रमाणे जेव्हा विज्ञानाचा पाया अधिक खोल आणि अधिक मूलभूत अशा ठिकाणी हलविण्यात आला आहे, तेव्हासुद्धा तथ्यांच्या प्रायोगिक पायाला कोणताही धोका पोचत नाही. किरणोत्सर्गी मूलतत्वांच्या अण्वंतर्गत बदलांचा शोध लागला, त्याचा परिणाम म्हणून रासायनिक विज्ञानाची सारी इमारत कोसळली आहे ही कल्पना इतकी वेडेपणाची आहे की, तिला उत्तरही देण्याची गरज नाही."

पुढे तो म्हणतो : "एका युगातील शास्त्रीय कृत्ये पुढच्या युगात हास्यास्पद ठरतात अशी भोंगळ भाषा कधी कधी वापरली जाते. शास्त्रज्ञसुद्धा ज्या विषयात त्याना मान्यता प्राप्त झालेली असते, तो विषय सोडून इतर विषयासंबंधी सामान्यपणे बोलण्याचा प्रयत्न करीत असताना अशी भोंगळ भाषा वापरीत असतात. पण अशी भाषाच मुळी त्यांच्या युगातील जी माणसे मते बनविण्याला सर्वात समर्थ असतात त्याना हास्यास्पद वाटत असते."

नववास्तवशास्त्र हे सापेक्षतावाद आणि पुंजसिद्धांत ( Quantum theory ) यांचे बनलेले आहे. सामान्यतः सापेक्षतावाद स्थूल घटनांचा विचार करतो, तर पुंजसिद्धांताचा संबंध सूक्ष्म घटनाशी येतो. पण सध्या निश्चित तत्वज्ञानात्मक अनुमाने काढता येतात, ती फक्त सापेक्षतावादापासूनच होय. सापेक्षतावाद ही तर्कदृष्ट्या जवळ जवळ स्वयंपूर्ण अशी समग्र पद्धति आहे. पुंजसिद्धांत हा अद्याप प्रवाही अवस्थेत आहे. त्याने शोधून काढलेली तथ्ये अद्यापही तात्पुरत्या मूल्यापेक्षा अधिक महत्वाचे तत्वज्ञानात्मक निष्कर्ष काढण्याकरिता लागणारी विश्वसनीय भूमिका मिळवून देणाऱ्या पूर्ण पद्धतीत बसू शकत नाहीत. नववास्तवशास्त्राचे 'क्रांतिकारक' विशेष हे पुंजसिद्धांताच्या क्षेत्रातीलच आहेत. ते विशेष अणूंच्या अंतर्गत जगातील आहेत. पूर्वी अज्ञात असलेल्या प्रदेशात आपली संशोधने रेटीत नेऊन वास्तवशास्त्राने नवीन आणि विलक्षण तथ्ये शोधून काढली आहेत. ही तथ्ये जुन्या








सिद्धांतांच्या चौकटीत सहजासहजी बसू शकत नाहीत. ही नवशोधित तथ्ये जेव्हा वस्तुतत्वशास्त्राच्या दृष्टीने तथ्ये म्हणून प्रस्थापित होतात आणि त्यांचे पूर्णतः पद्धतीकरण होते, तेव्हा नवे सिद्धांत बसवावे लागतात. पण हे सिद्धांत जुन्या सिद्धांतांची जागा घेत नाहीत, ते फक्त त्याना पूरक असतात. या दोहोंचे मिळून समग्र वास्तवशास्त्रीय ज्ञान बनत असते.

विज्ञानाचे नियम हे कधीच पूर्ण नसतात. त्यांचे वस्तुनिष्ठ प्रामाण्य निसर्गनियमाशी त्यांची जुळणी होते त्यात असते. नववास्तवशास्त्राचे नियम जुन्या वास्तवशास्त्रीय नियमांना खोटे ठरवीत नाहीत. त्यांच्या मर्यादेत ते सत्यच असतात. नवे नियम त्यांच्याही पुढे जात असतात. निसर्गनियमांशी ते अधिक प्रमाणात जुळत असतात.

वैज्ञानिकदृष्ट्या गुरुत्वाकर्षण आणि विद्युत्-चुंबकत्व यांची सांगड घालणे हे सापेक्षतावादाचे कर्तृत्व आहे. सापेक्षतावादाने घातलेली ही सांगड म्हणजे गॅलिलिओच्या वेळेपासून गेल्या तीनशे वर्षांत निरीक्षण आणि प्रयोग यांच्या साहाय्याने क्रमशः प्राप्त झालेल्या ज्ञानाच्या विशाल संचयाचे भव्य संश्लेषण होय. जुन्या वास्तवशास्त्राचा पाया घालणाऱ्या गृहीतकृत्यांच्या समूहाच्या आधारावर जे सैद्धांतिक तसेच प्रायोगिक संशोधन झाले, त्याच्या एकत्रित परिणामातून या संयोगाची वाट तयार झाली. या शोधांच्या क्रमात जी तथ्ये सापडली आणि ज्या कल्पना मूर्तरूपाला आल्या ती जुन्या वास्तवशास्त्राच्या सैद्धांतिक रचनेत बसू शकत नाहीत; आणि त्यांचे स्पष्टीकरणही समाधानकारक होऊ शकत नाही. सापेक्षतेच्या तत्वाच्या शोधानेच हे स्पष्टीकरण मिळाले.

न्यूटनचे गतिशास्त्र आणि ऊर्जेच्या ( energy ) विद्युत्-चुंबकीय प्रसरणाचे नियम यांच्यातील जो विसंवाद मॅक्स्वेल या शास्त्रज्ञाने दाखवून दिला. तो जुन्या वास्तवशास्त्राने गृहीत धरलेल्या गोष्टी टाकून दिल्यानेच नाहीसा करता आला. अनुभवपूर्व गृहीतके किंवा गृहीततत्वे ही भूतकाळात उपयुक्त संशोधनाकरिता प्रयाणबिंदू म्हणून उपयोगी पडली असली, किंवा निसर्गज्ञानातील पोकळी जरी त्यांच्यायोगे भरत असली, तरी अनुभवोत्तर ज्ञानाच्या प्रकाशात जेव्हा ती अनवश्यक ठरतात, तेव्हा ती टाकावी लागतात. उदाहरणार्थ, गुरुत्वाकर्षणाची शक्ती आणि ईथर या अशा तात्पुरत्या उपयोगी पडणाऱ्या गोष्टी होत्या. पण ज्ञानाच्या प्रगतीबरोबर मधल्या पोकळ्या जेव्हा नाहीशा होतात, त्यावेळी त्यांच्याशिवाय वास्तवशास्त्राचे काम चालू शकते. न्यूटनचे गतिशास्त्र आणि विद्युत्-चुंबकत्व या दोन जुन्या मुख्य उपपत्तींनी मिळून जवळ जवळ सर्व निरीक्षित घटनांचे स्पष्टीकरण होत होते. पण त्यांच्यातील विसंवाद बव्हंशी गुरुत्वाकर्षणशक्ती आणि ईथर या त्यांच्या गृहीत कृत्यामुळे उत्पन्न झाला. यापैकी पहिली दूर क्रिया सूचित करते आणि दुसरी सततचे माध्यम गृहीत धरते.

सापेक्षतावादामुळे वास्तवशास्त्राला अनवश्यक गृहीत कृत्यांचे जोखड झुगारून देता येणे शक्य झाले आहे. परिणामतः सगळ्या वास्तवशास्त्रीय उपपत्ती सामग्र्याने एकत्र गोवता आल्या आहेत. ही गोष्ट ज्ञानाची उच्चतर पातळी दर्शविते आणि तीमुळे निसर्गाच्या वास्तव सत्यांच्या अगदी समीप जाणे शक्य झाले आहे.

गुरुत्वाकर्षणशक्तीच्या गृहीतकृत्यासंबंधी सांगावयाचे तर आयन्स्टिनने ते अखेरीस टाकून दिले. त्याची पूर्वतयारी किर्शोफ आणि माख् यांच्या सैद्धांतिक कामगिरीने केली. किर्शोफ हा जुन्या पद्धतीचाच वास्तवशास्त्रज्ञ होता. आणि माख् न्यूटनच्या गतिशास्त्राच्या त्याच्या निव्वळ अभावात्मक टीकेवरून पहाता जुन्या आणि नव्या वास्तवशास्त्राच्या सीमारेषेवर उभा होता. या दोघानी मिळून प्रेरणाविज्ञानाची (mechanics) जी उपपत्ति मांडली, तिने न्यूटनच्या संकल्पनातील शक्ती या पदार्थाला गचांडी दिली. त्यांचाच सिद्धांत पुढे हेर्त्सने विस्तारित करून पूर्णतेला नेला. हेर्त्स हाही जुन्या धर्तीचाच शास्त्रज्ञ होता– त्याला त्या धर्तीचा शेवटचा पुरुष म्हणून संबोधता येईल. त्याने ज्या रीतीने तो पूर्णतेला नेला तीतून गतीचा एकमेव नियम असतो या निष्कर्षाप्रत तो गेला. हा निष्कर्ष विलक्षण रीतीने आयन्स्टिनच्या केवल गतिशास्त्राच्या ( Kinematics) अगदी नजीक पोचतो. या शास्त्राप्रमाणे प्रत्येक भौतिक पद्धति पृथ्वीच्या संदर्भात फिरत असते. बर्ट्रांड रसेलने हे दाखवून दिले आहे की " जरी या








सगळ्या प्रगतीत न्यूटनच्या पद्धतिपासून मूलतः प्रयाण अंतर्भूत नसले, तरी त्या प्रगतीने सापेक्षतावादाचा मार्ग घालून दिला.'' दुसऱ्या शब्दात जुने वास्तवशास्त्र आणि सापेक्षतावाद यांच्यात सातत्य आहे. खरोखरीच रसेल खाली उद्धृत केलेली घोषणा करण्याच्या मर्यादेपर्यंत जातो. ही त्याची घोषणा आधुनिक भौतिक विज्ञान आणि परिणामतः भौतिक तत्वज्ञान यांच्या विकासाच्या समग्र इतिहासाच्या मुळाशी असणाऱ्या सातत्याच्या सत्यस्थितीवर अधिकच भर देते.

तो म्हणतो : '' आता ही उपपत्ति बरीचशी पूर्णतेला गेली असल्याने सैद्धांतिक दृष्ट्या गॅलिलिओला तिचा शोध लागायला हवा होता किंवा निदान ज्यावेळी प्रकाशाचा वेग समजला, त्यावेळी तरी तो लागायला हवा होता हे समजू शकेल. तिच्यात एक तंत्र दिग्दर्शित होते, न्यूटनपेक्षाही अधिक चांगले तत्वज्ञान प्रतीत होते. खरोखरीच तिने तत्वज्ञानाचे तंत्र आत्मसात केले हा तिचा सर्वात लक्षणीय विशेष आहे. '' ( The Analysis of Matter ).

अशाप्रकारे सापेक्षतावाद हा जुन्या वास्तवशास्त्राचा तर्कसिद्ध परिणाम आहे. त्याची निर्मिति गॅलिलिओपासून संपादन केलेल्या प्रायोगिक आधारसामग्रीच्या आणि सैद्धांतिक ज्ञानाच्या समग्र साठ्यातून झाली आहे. तत्वज्ञानाच्या दृष्टीने सापेक्षतावादाने न्यूटनच्या यांत्रिक विश्वविज्ञानात सुधारणा केली. सामान्यतः समजले जाते, त्याप्रमाणे किंवा काही शास्त्रज्ञ म्हणतात त्याप्रमाणे तो न्यूटनच्या विश्वविज्ञानाचे खंडन करीत नाही. उदाहरणार्थ रसेल म्हणतो की, सापेक्षतावादाने जडवादी तत्वज्ञानावर जबरदस्त आघात केला आहे. जर तत्वज्ञानाच्या दृष्टीने रसेलने स्वतःच वर दिलेल्या उताऱ्यात यथार्थतेने म्हटल्याप्रमाणे सापेक्षतावाद न्यूटनच्या भौतिक तत्वज्ञानापेक्षा नुसताच '' अधिक चांगला '' असेल तर फरक आहे तो गुणवाचक नसून परिमाणवाचक आहे. तात्विक दृष्टीने पहाता सापेक्षतावाद भाववादासाठी किंवा जडवादविरोधी अशा दुसऱ्या कोणत्याही तत्वज्ञानासाठी म्हणून जडवादाचा त्याग करीत नाही. मात्र तो जडवादाला त्याच्या काही जुन्या लक्षणातून मुक्त करतो आणि अनुभवजन्य रीतीने संपादन केलेल्या भौतिक ज्ञानाच्या पायावर जडवादी तत्वज्ञान अधिक भक्कमपणे प्रस्थापित करतो. रसेलच्या म्हणण्याचा उघड अर्थ हाच आहे; आणि तो अर्थ जडवाद नाकारणे हा नव्या वास्तवशास्त्राचा गर्भितार्थ आहे या रूढ सिद्धांताच्या विरुद्ध आहे.

तत्वज्ञानाच्या दृष्टीने सुद्धा सापेक्षतावाद हा न्यूटनच्या भौतिक तत्वज्ञानापेक्षा अधिक योग्य आहे. कारण त्याला न्यूटनने गृहीत धरलेल्या अनुभवपूर्व तत्त्वांची गरज नसते. जडवादाच्या विरोधकाना त्याच्यावर हल्ला करण्याला या तत्त्वांनीच लक्ष्य पुरविले होते. न्यूटनचे विश्वविज्ञान जरी यांत्रिक होते, तरी जोपर्यंत गुरुत्वाकर्षणाचे स्वरूप गूढ होते, तोपर्यंत त्याने निसर्गातीत माध्यमाला अवसर मिळवून दिला. सापेक्षतावादाने हे गूढ उकलले. आयन्स्टिनच्या केवळ गतिशास्त्राप्रमाणे ( Kinematics ) जडद्रव्याच्या जोडीला शक्तीची गरज लागत नाही. देवाला हस्तक्षेप करण्याला तेथे वावच नाही.

आयन्स्टिनने ''तत्वज्ञानाचे तंत्र आत्मसात करून '' न्यूटनच्या तत्वज्ञानात सुधारणा केली याचा अर्थ काय ? त्याचा अर्थ हाच की, सापेक्षतावादाने दिग्दर्शित केलेले विश्वविज्ञान हे काटेकोरपणे अनुभवजन्य आहे आणि ते प्रायोगिक आधारसामग्रीच्या साहाय्याने गणिती पद्धतीने निर्गमित करण्यात आले आहे. न्यूटनच्या भौतिक तत्वज्ञानात शिरलेल्या आध्यात्मिक विशेषांच्या काल्पनिक घटकापासून ते पूर्णतः मुक्त आहे. सापेक्षतावाद असे दाखवून देतो की, विश्वाविषयीची यांत्रिक दृष्टी प्रत्यक्ष निरीक्षण, मापन आणि अचूक पडताळा देणाऱ्या आधारसामग्रीच्या कठोर गणिती विश्लेषणातून निष्पन्न झालेली सर्वसामान्य तत्त्वे यांच्यापासून उत्पन्न होते.

ज्या प्रायोगिक आधारसामग्रीने आणि गणिती तंत्राने सापेक्षतावादाची घडण झाली, ती जवळ जवळ सर्व संशोधनाच्या एका कालखंडात संग्रहीत होऊन विकसित झाली होती. हे संशोधन वास्तवशास्त्रज्ञांच्या आणि गणितज्ञांच्या एका परंपरेने जुन्या वास्तवशास्त्राच्या गृहीत कृत्यांच्या आधाराने चालविले होते आणि ते सर्व आयन्स्टिनने प्रायोगिक आधारसामग्री आणि गणिती तंत्र यांच्या द्वारे मिळणारे निष्कर्ष निर्णायक तात्विक अर्थवत्ता असणाऱ्या वास्तवशास्त्रीय ज्ञानाच्या एका तर्कसिद्ध, स्वयंपूर्ण अशा सूत्रबद्ध पद्धतीत गोवण्यापूर्वी

करण्यात आले होते. ईथरच्या अखंड माध्यमाच्या गृहीत कृत्याचा त्याग करणे आणि दिक्कालाच्या संकल्पनात झालेली क्रांति ही दोन्ही मायकेल्सन-मोर्ले या द्वयींनी अवकाशात केवल वेग मोजण्याकरिता केलेल्या प्रयोगाच्या निष्कर्षात अंगभूत होती. गेल्या शतकाच्या ऐशीतच हा प्रसिद्ध प्रयोग करण्यात आला होता, आणि विशेषतः लारमोर आणि लॉरेन्स यांच्या प्रयोगानी प्रत्यक्षपणे सापेक्षतावादाच्या जन्माची वाट मोकळी केली. हे सर्व पूर्वसूरी जुन्या वास्तवशास्त्राचे पाईक होते.

ही क्रांति, विशेषतः ज्ञानशास्त्रीय अर्थाने, मूलतः तत्वज्ञानात्मक होती. या क्रांतीच्या परिणामातून निर्माण झालेले तत्वज्ञान जुन्या वास्तवशास्त्राशी निगडित असणारे आणि १८ व्या आणि १९ व्या शतकातील विश्वाविषयीच्या निम-जडवादी यांत्रिक संकल्पनात प्रकट होणारे निसर्गाचे तत्वज्ञान नव्हते. उलट दिक्काल, जडद्रव्य, गति आणि शक्ती यांच्याविषयीचे केवलवादी संकल्पन नष्ट करून अभिजात भाववादावर ते शेवटचा आघात करते. सापेक्षतावाद निसर्गाविषयीच्या यांत्रिक तत्वज्ञानाला त्याच्या दोषातून आणि उणीवातून मुक्त करतो, त्या तत्वज्ञानातील दोषावर झडप घालून सर्व तऱ्हेचे प्रच्छन्न भाववाद मांडण्यात येत होते. सापेक्षतावादाने विरोधविकासात्मक जडवादाच्या विजयाला फार मोठा हातभार लावला आहे. सापेक्षतावाद हा वास्तवशास्त्रीय उपपत्तीची पद्धति या नात्याने त्या शास्त्राच्या जुन्या कल्पनाना विरोधी नसून त्या कल्पनाशी त्याचे सातत्याचे संबंध आहेत. त्यामुळे त्याची फलनिष्पत्ति निश्चित असणे क्रमप्राप्त आहे.

वैज्ञानिक विचारांच्या सांकल्पनिक पद्धतीत झालेले हे बदल जुन्या वास्तवशास्त्राच्या तात्विक पायावर तत्वज्ञानाची ज्या प्रकारची टीका होत होती, तिला अनुसरूनच नेमके झाले आहेत. ब्रोड म्हणतो : "आम्ही जेव्हा जडाविषयीच्या संकल्पनाचा विचार करू लागतो. त्यावेळी तत्ववेत्ते या नात्याने हे बदल स्वीकारणे आम्हाला भाग पडते आणि ते बदल वास्तवशास्त्रज्ञांच्या अगदी खास स्वतःच्या कारणाकरिता त्याना करावे लागतात हे दाखवून देण्याची आशा मी बाळगतो. याची ढोबळ रूपरेषा जरी मला दाखविता आली, तरी दिक्काल, गति आणि जडद्रव्य यांच्या विषयीच्या अगदी नव्या मतांची बाजू अधिक बळकट होईल. प्रथम दर्शनीच या मतात अतिशय विरोधाभासाचे आणि व्यवहारज्ञान डावलणारे असे बरेचसे आहे. त्यामुळे वैज्ञानिकालासुद्धा त्याच्या विज्ञानाच्या खास गरजेपेक्षाही इतर कारणाकरिता त्या मतांचे समर्थन करता येते हे समजणे फायद्याचेच आहे. दुसऱ्या बाजूने आपण विज्ञानाच्या कोणत्यातरी प्रत्यक्ष विभागात उपयुक्त निष्कर्षाच्या नेणाऱ्या दिशेने काम करीत आहो हे समजणे तत्ववेत्याला नेहमीच समाधान देणारे असते" ( Scientific Thought ).

संकल्पना आणि पदार्थ यांची स्वरूपे स्पष्ट करून सांगणे हे तत्वज्ञानाचे कार्य होते. या संकल्पनाची आणि पदार्थाची कार्ये आणि त्यांचे संबंध शोधावे हे वैज्ञानिक संशोधनाचे उद्दिष्ट होते. या कार्यविभागणीचा परिणाम असा झाला की, एका बाजूने तत्वज्ञानाने पत्करलेले कार्य विज्ञानाने आवश्यक ती पूर्णावस्था निर्माण केल्याशिवाय साध्य होणे शक्य नसल्यामुळे तत्वज्ञानाच्या कार्यात गोंधळ निर्माण झाला. अनुभवजन्य रीतीने संपादन केलेल्या निसर्गज्ञानाच्या शोधक प्रकाशातच केवळ अवकाश, काल, शक्ती इत्यादि तात्विक कल्पना स्पष्ट करून सांगणे शक्य होते. दुसऱ्या शब्दात अशा अनुभवपूर्व व्यवहारी संकल्पनांचा प्रत्यक्ष आशय शोधून काढणे शक्य असते. दुसऱ्या बाजूने विज्ञानाने त्याच्या संशोधनाच्या आवाक्यालाही मर्यादा असते हे मान्य केले. पण काळाच्या ओघात विज्ञानाने ही मर्यादा ओलांडली. निसर्गनियमाचा शोध घेत असताना त्याने मूलभूत भौतिक वस्तूंच्या कार्यांच्या आणि संबंधांच्या पलीकडे आपले संशोधन रेटत नेले. त्या वस्तूचे सत्य स्वरूप, त्यांची अंतर्गत रचना हीसुद्धा शास्त्रीय संशोधनाची उद्दिष्टे बनली. अशा प्रकारे विज्ञानाने आपल्या विकासक्रमात तत्वज्ञानाच्या राखीव क्षेत्रावर आक्रमण केले आणि जे प्रश्न सोडविण्यात तत्वज्ञान अपयशी ठरले होते त्यातच त्याने हात घातला.

आतापर्यंत जे प्रश्न सत्ताशास्त्राच्या कक्षेतील म्हणून समजण्यात येत असत ते वास्तवशास्त्रीय संशोधनाच्या क्षेत्रात आणणे यात नव्या वास्तवशास्त्राची अर्थवत्ता सांठलेली आहे. दिक्, काल, जडद्रव्य, कार्यकारण-










भाव इत्यादि मूलभूत संकल्पना या आता केवळ काल्पनिक विचाराचे विषय राहिले नाहीत. त्यांच्या सत्य स्वरूपाचे आणि अंतर्गत रचनेचे यथार्थ ज्ञान निरीक्षण आणि प्रयोग यांच्या द्वारे मिळत आहे.

युगानुयुगे तत्वज्ञान दिक्कालाच्या स्वरूपाविषयी व्यर्थपणे केवळ चिंतन करीत आले आहे. अनुभव आणि प्रायोगिक आधारसामग्री यांच्या प्रकाशात पारंपरिक तात्विक संकल्पनांची तपासणी करून सापेक्षतावाद त्याच्या सत् तत्वाच्या आशयाचा शोध घेतो. तो हे दाखवून देतो की, दिक् आणि काल या सत्ताशास्त्रीय वस्तू नाहीत त्या जडद्रव्याच्या पूर्वीच्या नसतात. उलटपक्षी दिक् आणि काल यांच्या विषयीच्या संकल्पना जडाच्या सत् (being) आणि भवत् (becoming) यांच्या संबंधीच्या आमच्या अनुभवातून उत्पन्न होतात. चिंतनात्मक तत्वज्ञानानुसार अवकाश हा जडाचे आश्रयस्थान असतो. न्यूटनने अवकाशाची हीच कल्पना स्वीकारली आणि ती जुन्या वास्तवशास्त्रात प्रविष्ट केली होती. आयन्स्टिनने असे दाखवून दिले की, पोकळ अवकाश ही अर्थहीन, अतर्क्य संकल्पना आहे आणि अवकाश अस्तित्वात असतो याचे कारण जडवस्तु अस्तित्वात असतात. कोणत्याही दोन वस्तूमधील अंतर म्हणून तो अस्तित्वात असतो. तसेच तात्विक पोकळीत वहात येणारा असा केवळ काल नसतोच. कालाची संकल्पना ही भवत्च्या (becoming) भौतिक वस्तुस्थितीतून उत्पन्न झाली आहे. काल म्हणजे दोन घडलेल्या गोष्टीतील अंतर, म्हणजेच कोणत्याही एका पदार्थात होणारा बदल होय.

नव्या वास्तवशास्त्राच्या सिद्धांतांचे ठळक स्वरूप आणि त्यातून निघणारी तात्विक अर्थवत्ता ही हायसेनबेर्गच्या "The Physical Principles of the Quantum theory" या ग्रंथातील खालील उताऱ्यावरून स्पष्टपणे दिग्दर्शित होतात :

"सापेक्षतावादाच्या प्रस्थापनेमुळे अगदी प्रथमच दैनंदिन अनुभवाच्या संदर्भात कल्पिलेल्या आदर्श जगापासून स्वाभाविक जग भिन्न असते हे मान्य करणे अवश्य झाले. आधुनिक कालात प्रायोगिक तंत्रात खूपच सुधारणा झाली आहे. या सुधारणेमुळे उपलब्ध झालेल्या प्रायोगिक सामग्रीमुळे जुन्या कल्पनांची फेरतपासणी करणे आणि नव्या कल्पनाना जन्म देणे आवश्यक झाले. पण अनुभवाच्या आणि संकल्पनांच्या वाढत्या कक्षेशी जुळवून घेण्याला मन नेहमीच वेळ घेत असते. त्यामुळे सापेक्षतावाद हा प्रथम अस्वीकार्य होण्याइतका गूढ वाटला. तथापि त्रासदायक ठरलेल्या समस्येची त्याने साध्या रीतीने जी उकल केली, त्यामुळे त्याला सार्वत्रिक मान्यता मिळाली. अणुविज्ञानाने टिपलेल्या तथ्याशी जमवून घेणारे विचार आणि भाषा बनविणे हे काम कठीण वाटते. सापेक्षतावादाच्या बाबतीत दिक्कालाच्या प्रश्नाविषयीच्या तत्वज्ञानाच्या जुन्या चर्चेकडे परत वळणे फायद्याचे ठरले. त्याचप्रकारे, ज्ञानशास्त्राच्या दृष्टीने जगाची आत्मनिष्ठ आणि वस्तुनिष्ठ स्वरूपे वेगळी करणारे मूलभूत विवेचन महत्वाचे आहे; त्याची फेरतपासणी करणे आता उपयुक्त ठरणार आहे. आधुनिक सैद्धांतिक विज्ञानाच्या वैशिष्ट्यपूर्ण अशा कित्येक अमूर्त गोष्टी मागच्या तत्वज्ञानाने चर्चिल्याचे आढळून येते. वास्तव गोष्टीशी संबंध ठेवणाऱ्या शास्त्रज्ञानी त्यावेळी या अमूर्त गोष्टींचा मानसिक करामत म्हणून अव्हेर केला. पण आज प्रायोगिक कलेत घडून आलेल्या सुधारणेमुळे त्यांचा गंभीरपणे विचार करणे भाग पडत आहे."

विज्ञान आणि तत्त्वज्ञान यांच्यातील सीमारेषा यापुढे राखता येणार नाही. वास्तव शास्त्रीय संशोधन यापुढे वास्तवतेच्या औपचारिक दृष्टीमुळे मर्यादित रहाणार नाही. ते आता वास्तवतेच्या स्वरूपाशी निगडित झाले आहे. हा विषय पूर्वी केवळ चिंतनात्मक रीतीने विचार करण्याकरिता तत्त्वज्ञानाकडे सोपविला होता. म्हणून तत्त्वज्ञानाने शतकानुशतके शुष्कपणे चर्चिलेले प्रश्न निरीक्षण आणि प्रयोग यांच्या वैज्ञानिक पद्धतीने आता हाताळले जात आहेत; आणि ते क्रमशः सोडविलेही जात आहेत. प्रायोगिक तंत्रातील सूक्ष्मतेमुळे पूर्वी सत्ताशास्त्राच्या समजल्या गेलेल्या गोष्टी आणि शुद्ध विचाराचे म्हणजे चिंतनाचे विषय वैज्ञानिक संशोधनाच्या आटोक्यात आले. अशा गोष्टींच्या अनुभवपूर्व संकल्पना त्यांच्या संबंधीच्या यथार्थ ज्ञानाशी जुळतील अशाच रीतीने बदलणे अशक्य झाले आहे. हे ज्ञान निरीक्षण आणि प्रयोग यांच्या अनुभववादी पद्धतीने प्राप्त झालेले








असते. सापेक्षतावाद दिक् आणि काल यांच्या त्रासदायक प्रश्नांची उकल करू शकला आहे. कारण आधुनिक संशोधनाने आपल्या सुधारलेल्या प्रायोगिक तंत्राच्या साहाय्याने या तात्त्विक गोष्टींचे स्वरूप उघड केले आहे; त्या संकल्पनांचा आशय शोधून काढला आहे. दिक् आणि काल या सर्व भौतिक घटना पूर्ववर्ती आणि स्वतंत्र अशा केवळ तात्त्विक वस्तु असतात असे मानल्यामुळे साहजिकच त्यांच्या प्रश्नाने गोंधळ निर्माण केला. पण निरीक्षित तथ्ये आणि प्रायोगिक आधारसामग्री यांच्या प्रकाशात जेव्हा हे पटले की, स्वाभाविक जगाचे घटक या नात्याने दिक् आणि काल यांना त्यांच्याशी आदर्श सत्ताशास्त्रीय तात्त्विक पदार्थ म्हणून जोडली गेलेली केवलता नसते, तेव्हा यांच्याविषयीचा गोंधळ मिटला. दिक् आणि काल हे आमच्या अनुभवात केवळ सापेक्ष वस्तु म्हणून प्रवेश करतात, हा शोध लागल्यानंतर त्याचा परिणाम म्हणून त्यांच्याविषयींचे सारे रहस्य नाहीसे झाले. त्यांची केवलता ही एक काल्पनिक पोकळ संकल्पना होती. केवलत्वाची व्याख्या करण्याच्या प्रयत्नात गूढता निर्माण होते. कारण केवल हे खरोखरीच केवल असेल, तर त्याची व्याख्या करता येणार नाही. अव्याख्येयाची कोणतीही व्याख्या रहस्यात गुरफटली जाणे, कूट शब्दात झाकली जाणे क्रमप्राप्त असते. दिक् आणि काल यांच्या जुन्या तत्वज्ञानाच्या व्याख्या अशाच आहेत. ज्याचे आम्हाला ज्ञान असते, त्याचीच व्याख्या आम्ही करू शकतो. निरीक्षण आणि प्रयोग यानी यथार्थ ज्ञान प्राप्त होते. दिक् आणि काल यांच्या घटनांचे केवळ सापेक्ष वस्तु म्हणून– जडद्रव्याशी असणाऱ्या त्यांच्या संबंधात– निरीक्षण आणि मापन करता येते. सापेक्षतावाद हा दिक्कालांच्या केवलवादी, भावात्मक संकल्पनांची निरर्थकता उघड करून दाखवितो आणि त्या पदार्थांच्या त्रासदायक प्रश्नाची उकल करतो. दिक्काल हे प्रतीतीला येणारे सत्तत्व या नात्याने भौतिक अस्तित्वाच्या पूर्वीचे आणि त्याहून स्वतंत्र असू शकत नाहीत, पण ते त्या अस्तित्वाचे गुणधर्म असतात आणि म्हणून भौतिक वस्तूंच्या हालचालींच्या आणि त्यांच्यात होणाऱ्या बदलांच्या संदर्भात त्यांची व्याख्या करता येते, त्यांचे मापन करता येते आणि त्यांची प्रतीति येऊ शकते हे दाखवून सापेक्षतावाद त्यांच्या विषयीचे सारे रहस्य उलगडून दाखवतो.

पण पारंपरिक विचारसरणीतून बाहेर खेचले जाणे हे मानवी मनाला धक्का देणारे असते. आभासाना सत्य म्हणून मानल्याखेरीज ते टिकू शकत नाहीत. एकदा सत्य म्हणून गृहीत धरल्यानंतर ते अनुभवाला जुमानीत नाहीत. दिक् आणि काल यांच्या केवलत्वाची कल्पना मानवी मतात इतकी खोलवर रुजली आहे की, ती सहजासहजी उखडून काढता येत नाही. सामान्य मर्त्य मानवाला ती एक तात्विक संकल्पना वाटण्याऐवजी श्रद्धातत्व वाटत असते. म्हणून पद्धतशीर निरीक्षण आणि सूक्ष्म प्रयोग यांच्या साहाय्याने दिक् आणि काल ही खरोखरीच जशी शोधून काढली आहेत तशी त्यांची कल्पना करणे अति कठीण आहे.

म्हणून नववास्तवशास्त्रीय सिद्धांत हे घोटाळ्यात पाडणारे नाहीत. उलटपक्षी निसर्गसत्यावर ते नवे प्रकाशझोत टाकत आहेत. हे नवे झोत आरंभी साहजिकपणे आमचे डोळे दिपवून टाकतात. आमच्या आदर्श कल्पना अनुभवाच्या मूर्त वस्तूसाठी टाकून देण्याला आम्ही नाखूष असतो. नव्या वास्तवशास्त्राची क्रांतिकारक अर्थवत्ता ही की, ते आम्हाला आमच्या अनुभवपूर्व तात्विक कल्पना अनुभवजन्य तथ्याना अनुसरून बदलण्याला भाग पाडीत असते. तांत्रिक अर्थाने सापेक्षतावाद हा वास्तवशास्त्राची एक उपपत्ती यापेक्षा अधिक मोठा आहे. तो विश्वविज्ञानाची एक पद्धति आहे. आणि ही पद्धति गेल्या तीन शतकात वैज्ञानिक संशोधनाने गोळा केलेल्या वास्तवशास्त्रीय ज्ञानाच्या एकूण साठ्याच्या भरीव पायावर उभी करण्यात आली आहे. परिणामतः ज्ञानशास्त्राच्या दृष्टीने सापेक्षतावादाचे महत्व दूरगामी आहे. तत्वज्ञानाची ती एक व्यापक पद्धति आहे– केवळ चिंतनात्मक विचारांची ती बंदिस्त पद्धति नाही, तर अनुभवजन्य ज्ञानाच्या प्रकाशात निरीक्षण केलेल्या सर्व नैसर्गिक घटनांचे ते सुसंगत स्पष्टीकरण आहे.

अणुविज्ञानाच्या शोधांना अनुसरून आमचे विचार आणि भाषा तयार करणे हे अधिक कठीण आहे. कारण या शोधांचा संबंध भौतिक जगाच्या पूर्णतः नवीन आणि निःशंकित अशा बाजूशी येतो. सापेक्षता-










वाद हा एका सबंध कालखंडाच्या शास्त्रीय संशोधनाची परिणति आहे. याउलट पुंजसिद्धांत शास्त्रीय संशोधनाचे एक नवेच दालन खुले करतो. जुन्या वास्तवशास्त्राने विविध निसर्गघटनांचा जो अभ्यास केला, तो त्यांचे नियमन करणाऱ्या सामान्य नियमांचा शोध घेण्याच्या हेतूनेच होय. ते शास्त्र जडद्रव्य गृहीत धरत होते. जडद्रव्य आणि ऊर्जा ही जुन्या वास्तवशास्त्राची मूलभूत गृहीत कृत्ये होती. त्याना प्राथमिक अव्याख्येये असे म्हणता येईल. या मूलभूत पदार्थांची अंतर्गत रचना ही सध्याच्या वास्तवशास्त्रीय संशोधनाचा विषय आहे. द्रव्याची सत्ताशास्त्रप्रणीत संकल्पना वितळत्या मुशीत ओतण्यात आली आहे. जडद्रव्याचे संकल्पन भौतिक जगाच्या मूलभूत घटकांच्या रचनेच्या यथार्थ ज्ञानाशी जळवून घेणे अवश्य आहे. तत्ववेत्ते द्रव्याच्या स्वरूपाविषयी वाद घालीत होते. देकार्तवाद्यांच्या मते ते सर्वव्यापी असते. इतर काही जणाना लायब्नित्सच्या मोनाड सिद्धांतात प्रकट होणारे कणयुक्त संकल्पन मान्य होते. अणुविज्ञान हे आता चिंतनात्मक तत्वज्ञानातील हा जुना वाद मिटविण्याच्या मार्गावर आहे; आणि ते द्रव्याविषयीच्या या दोन्ही मतांची सांगड घालण्याचे आश्वासन देत आहे. कारण भौतिक जगाच्या मूलभूत घटकांच्या अंगी कण तसेच लहरी या दोहोंचेही गुणधर्म असतात असा शोध लागला आहे.

साहजिकच द्रव्याचे हे नवे संकल्पन ग्रहण करणे अतिशय कठीण वाटते. या संकल्पनानुसार जडद्रव्य आणि ऊर्जा ही एका गतिमान, एकविध, आद्य, भौतिक अस्तित्वात एकजीव होतात आणि हे अस्तित्व सर्व निसर्ग घटनांची पार्श्वभूमी असते. दैनंदिन अनुभवाच्या भाषेत याची कल्पना करता येत नसल्यामुळे हे अतिशय बिकट वाटते. हे संकल्पन अतिशय अमूर्त असून ते केवळ संदिग्ध गणिती भाषेतच व्यक्त करता येते. म्हणून अणुविज्ञानाचे सिद्धांत या मनाच्याच रचना वाटतात. पण ते सिद्धांत इतर कोणत्याही वैज्ञानिक सिद्धांताप्रमाणेच निरीक्षण आणि प्रयोग यांच्यापासूनच निष्पन्न झाले आहेत.

येथेच आमच्यासमोर तत्वज्ञानाची एक समस्या उभी रहाते. ही समस्या म्हणजे ज्ञानाची ( perception ) होय. वास्तवशास्त्राच्या उपपत्ति या प्रत्यक्ष ज्ञानाने प्राप्त झाल्या नाहीत. अतिशय अमूर्त स्वरूपाच्या या उपपत्तींचा प्रयोगांच्याद्वारे जो पडताळा मिळतो, त्यावरून त्या वास्तव भौतिक वस्तूंचे ज्ञान दर्शवितात हे सिद्ध होते. दुसरी गोष्ट ही की, कोणत्याही अमूर्तत्वात फार मोठा आत्मनिष्ठ घटक सामावलेला असतो. त्यामुळे वास्तवशास्त्रीय संशोधन अशा मर्यादेपर्यंत येऊन ठेपले आहे की, वस्तुनिष्ठ आणि आत्मनिष्ठ यांच्या सीमारेषा लोप पावत आहेत. आनुभविकरीत्या अखेरीस आत्मनिष्ठ वस्तुनिष्ठापासून वेगळे करता येत नाही असे जर आढळून आले, तर तत्वज्ञानाला सर्वात गोंधळात टाकणाऱ्या ज्ञानाच्या प्रश्नांची उकल होईल. बाह्य जग हे चुकीचे नामाभिधान आहे या तथ्याची जाणीव करून देणाऱ्या दिशेने आधुनिक वास्तवशास्त्रीय संशोधन आम्हाला नेत आहे. आम्ही आमच्या अनुभवाच्या जगाचे एकात्म भाग आहोत. आम्ही जग पहातो ते बाहेरचे म्हणून पहात नसतो. आमची जाणीव, आमचे अहम्, आमची बुद्धि– हे सर्व आत्मनिष्ठ पदार्थ तथाकथित बाह्य जगाच्या रचनेत अतूटपणे गुंतले आहेत. निसर्गाचे हे आत्मनिष्ठ घटक वस्तुनिष्ठ भौतिक जगाच्या सबंध गुंतावळीचे भाग आहेत. भौतिक जगाच्या पार्श्वभूमीतून ते उत्पन्न होतात. आणि म्हणून जगाविषयीचे ज्ञान मिळविण्याची साधने म्हणून ते उपयोगी पडतात. मन हे जडापासून जर मूलतः भिन्न असते, तर या दोहोमध्ये संबंध असणे शक्य झाले नसते; आणि ज्ञान हे अशक्य झाले असते. जैविक विज्ञाने जडवादी एकतेच्या मूलभूत तथ्याची जाणीव करून देण्याच्या दिशेने आम्हाला नेत आहेत. आता वास्तवशास्त्रीय संशोधन निसर्गाच्या मूलभूत घटकांच्या अंतर्रचनेचे पृथक्करण करून त्याच बिंदूकडे पोहोचत आहेत.

---








श्री. गणेश उमाकांत थिटे

# ब्राह्मणग्रंथातील पशुयज्ञ आणि अहिंसा*

## प्रस्तावना-

सर्वसामान्यपणे असे मानण्यात येते की ब्राह्मणांचे यज्ञविधि आणि त्यातील पशुहत्येला बौद्ध जैन ह्यांनी विरोध केला. जणू काही सर्व ब्राह्मण हे पक्के हिंसावादी आणि यज्ञ करणारेच होते! प्रत्यक्ष यज्ञविधिविषयक वैदिक साहित्याचा सूक्ष्म अभ्यास केला असता मात्र असे आढळून येते की यज्ञांचे वर्णन करणाऱ्या ग्रंथांमध्येच अहिंसेची चिन्हे आपल्याला पदोपदी भेटतात. वैदिक यज्ञांचे वर्णन आणि स्पष्टीकरण ह्या दृष्टीने ब्राह्मणग्रंथांचे महत्व अजोड आहे हे सांगावयास नकोच. वैदिक कालातील विचारवंत यज्ञाकडे कसे पाहात होते हे कळण्यासाठी वैदिक साहित्याचा व विशेषतः ब्राह्मणग्रंथांचा अपरिहार्यपणे उपयोग केला पाहिजे हे उघड आहे. पशुयज्ञ आणि त्यातील पशुहत्या ह्याकडे ब्राह्मणग्रंथ कोणत्या दृष्टीने पाहतात हे शोधणे हा प्रस्तुत निबंधाचा विषय आहे.

## पशुयज्ञ-सामान्य वैशिष्ट्ये

पशुयज्ञ[1] हा सोमयज्ञाचा भाग असून सोमसवन आणि सोमहवनाच्या दिवशी तो केला जातो. सात हविर्यज्ञसंस्थांमध्येहि "पशुबन्ध" ह्या नांवाने ओळखला जाणारा एक स्वतंत्र पशुयज्ञ आहे ( पहा–गोपथब्राह्मण १. ५. ७ ). शतपथ ब्राह्मण ११. ७. २. १. मध्ये ह्या दोन प्रकारच्या पशुयज्ञातील फरक सांगतांना असे म्हटले आहे – हविर्यज्ञविधो ह वा अन्यः पशुबन्धः । सवविधोऽन्यः। स हैष हविर्यज्ञविधो यस्मिन व्रतमुपनयति यस्मिन्नपः प्रणयति यस्मिन पूर्णपात्रं निनयति यस्मिन् विष्णुक्रमान् क्रमयति । अथ हैष सवविधो यस्मिन्नेतानि न क्रियन्ते । म्हणून पशुबन्धात व्रतोपनयन, अपः प्रणयन, पूर्णपात्रनिनयन, विष्णुक्रम हे विधि असतात व सोमयज्ञातील पशुयज्ञात हे नसतात. यूप तयार करणे, तो उभारणे, पशूला यूपास बांधणे, त्याला मारणे, त्याची वपा काढून ती अग्नीत टाकणे इत्यादि विधि पशुयज्ञात समाविष्ट आहेत.

## पशुहत्त्येबद्दलचा दृष्टिकोण

ब्राह्मणग्रंथांनी दिलेले पशुयज्ञांतर्गत विधींचे वर्णन वाचताना असे ध्यानात येते की, पशुयज्ञांतील "हिंसेचे ब्राह्मणग्रन्थ उदात्तीकरण करण्याचा प्रयत्न करीत आहेत. मांसभक्षण हे इतर काळांप्रमाणेच ब्राह्मणकाळातही सर्वसामान्य होते तरी प्रत्यक्ष पशूला मारण्याची क्रिया यज्ञकर्म करणाऱ्या काही संवेदनाक्षम मनाच्या माणसांना त्रासदायक वाटत असावी. पुरुषमेधाच्या संदर्भात ब्राह्मणग्रंथानी केलेल्या विवेचनात आपणाला सुसंस्कृततेची आणि हिंसाविरोधी काही चिन्हे दिसतात. पुरुषमेधात पुरुष हेच पशूप्रमाणे वापरले जातात. पण त्या संदर्भात ते पुरुष योग्य ते संस्कार केल्यानंतर सोडून द्यावेत असे सांगितले आहे. पुरुषमेधाची व्युत्पत्ती देताना जरी शतपथब्राह्मण १३. ६. २. १ मध्ये " येथे मेध्य पुरुषांस मारले जाते म्हणून हा पुरुषमेध " असे म्हटले असले तरी पुढे शतपथब्राह्मण १३. ६. २. १२–१३ मध्ये एक कथा सांगितली आहे – जेव्हा नारायण पुरुषमेध करीत होता तेव्हा पुरुषांस मारण्याच्या वेळी अेक आवाज उमटला " हे पुरुषा , तू ह्या पुरुषांस मारू नकोस. जर मारशील तर पुरुषच पुरुषास खाईल." मग नारायणाने त्या पुरुषांना पर्यग्निकरण झाल्यावर

* भारत-इतिहास-संशोधन-मंडळ ( पुणे ) येथील ५६ व्या संमेलनात ( दि. १-६-१९६९ ) इंग्लिश्मधून वाचलेल्या निबंधाचे हे मराठी रूपांतर आहे.

१ पशुयज्ञाच्या वर्णनासाठी पुढील साहित्य पहा– *Weber, Indische stvdien*, X. 344 ff; *Hillebrandt, Ritiullitteratur Vedische Opfer und Zauber*, Strassburg, 1897 P. 121; *Schwab Das altindische Thieropter*,, Erlagen, 1886. J. Gonda, *Religichen Indiens* I Stuttgart, 1960, p. 147 ff;









अनुक्रमणिका

सोडून दिले. तैत्तिरीय ब्राह्मण ३. ९. ८. ३ मध्ये असे सांगितले आहे की पर्यग्निकरणानंतर पुरुष आणि अरण्यातील पशूना सोडून द्यावे ह्यांची **हिंसा होऊ नये** म्हणून ( अहिंसायै ).

ह्यावरून हे स्पष्ट दिसून येईल की नंतरच्या हिंदू धर्मात तसेच बौद्ध व जैन मतप्रणालीत प्राधान्याने ज्याचा उल्लेख होतो ते अहिंसातत्त्व ब्राह्मणग्रंथातच आलेले आहे– आणि तेसुद्धा पशुयज्ञाच्या ( पुरुष हा एक ज्याचा यज्ञीय पशूच मानला आहे) संदर्भात आले आहे. ब्राह्मणग्रंथांनी पुरुषमेध ( की जो एकेकाळी केला जात असे आणि ह्या ना त्या स्वरूपात नंतरही केला जात असे ) निदान वैदिक यज्ञांच्या परिसरात तरी प्रतीकात्मक बनवला आहे. पुरुषमेधात पशूची हिंसा करावयास ब्राह्मणग्रंथांनी बंदी घातली आहे.

ब्राह्मणग्रंथांच्या हिंसेच्या उदात्तीकरणाच्या प्रक्रियेत आणि " यूफेमिस्टिक् " पद्धतीने हिंसेच्या उल्लेखातही अहिंसेची बीजे आपणास दिसतात.

**( अ ) क्रूरत्वाची जाणीव–** पशुयज्ञातील पशुहिंसेमध्ये असणारे " क्रूरत्व " यज्ञकर्त्यांना जाणवल्याचे ब्राह्मणग्रंथात आपणास दिसते. म्हणूनच पशूला मारल्यानंतर त्यांच्यावर पाणी शिंपडण्याचा गूढार्थ सांगताना शतपथ ब्राह्मण ३·८·२·८ व पुढे असे सांगितले आहे पाणी शिंपडल्यामुळे जे काही " क्रूर " केले गेले आहे त्याची शांति होते. वपाहोमानंतर हात धुण्याचे कारण अशाच प्रकारे सांगितले आहे. " जेव्हा ते पशूला मारतात तेव्हा ते " क्रूर " करतात. पाणी हे शांतीचे साधन आहे. त्याच्या साहाय्याने ते शांति करतात ( शतपथ ब्राह्मण ३·८·२·३०. )

**( आ ) ही हिंसा नाहीच–** ब्राह्मणग्रंथ पशुयज्ञातील हिंसा ही हिंसा नाहीच असे दाखवतात. पशूला नेताना त्याला यजमानाने धरू नये असे काही ब्रह्मवादी म्हणतात : "कारण तो पशु मृत्यूकडे नेला जात आहे." ह्यावर शतपथब्राह्मणात असे उत्तर दिले आहे की " यजमानाने पशूला धरावेच. कारण पशूला **मृत्यूकडे नेणे** चाललेले **नाहीच** तर यज्ञाकडे नेले जात आहे. (३·८·१·१०). येथे आपणास मृत्यू , हत्या वगैरे कल्पनांचा सौम्य करण्याचा स्पष्ट प्रयत्न दिसतो. पशूची हत्या होत नसून आणि त्याचा मृत्यु होणार नसून त्याचा " यज्ञ " होणार आहे असे ब्राह्मणग्रंथात म्हटले आहे. ह्या ठिकाणीच आपल्याला पुढील काळात जास्त प्रकटपणे सांगितलेल्या " यज्ञातील हिंसा ही हिंसा नव्हेच " ह्या तत्त्वाचे मूळ दिसते. पहा मनुस्मृति ५·३९ –यज्ञार्थं पशवः सृष्टाः स्वयमेव स्वयंभुवा । यज्ञस्य भूत्यै सर्वस्य तस्माद्यज्ञे वधोऽवधः ॥ तुलना करा – वसिष्ठ स्मृति ४·७

**(इ) पशू मारला जात असता न पाहणे–** श. प. ब्रा. ३·८·१·१५ येथे आपणास असे कळते की पशूला मारले जात असता पाहणे सुद्धा टाळावयास सांगितले आहे. जेव्हा पशू मारला जात असतो तेव्हा यज्ञवेदीकडे मागे जाऊन, आहवनीयाग्नीकडे तोंड करून ऋत्विज् बसतात, " नाहीतर आम्ही पशूच्या हत्येचे साक्षीदार होऊ ( नेदस्य संज्ञप्यमानस्य अध्यक्षा असाम ) " ह्यावरून ऋत्विजांमध्ये पशुहत्येविषयी कशी तिरस्काराची भावना होती ह्याची काहीशी कल्पना येते.

**(ई) पशूचे गूढार्थाने रक्षण–** जरी पशूला मारावयाचे आहेच तरी त्याचे गूढार्थाने " रक्षण " करण्याचा कसा प्रयत्न होतो हे पाहणे ह्या दृष्टीने उद्बोधक ठरेल. अध्वर्यू यूपाचा एक तुकडा घेऊन, त्याला तूप लावून सुऱ्यासह पशूच्या कपाळावर धरतो व पुढील शब्द उच्चारतो-घृतेनाक्तौ पशूंस्त्रायेथाम् ( वाजसनेयी संहिता ६·११ ) म्हणजे तूप लावलेल्या ( हे यूपशकल आणि सुरा ह्यांनो ) तुम्ही पशूचे रक्षण करा (शतपथ ब्रा. ३·८·१·५ तसेच पर्यग्नीकरण ( पशूभोवती अग्नी नेणे ) ह्याचाही उद्देश पशूभोवतालची दुष्ट पिशाचे अग्नीच्या योगे दूर ठेवणे हा आहे ( श. प. ब्रा. ३·८·१·६; ) तुलना करा. कौषीतकि ब्राह्मण १०·३ ) पशूचे विविध अवयव कापताना अध्वर्यू एक गवताची काडी पशूवर ठेवतो व म्हणतो " ओषधे त्रायस्व ( हे ओषधे रक्षण कर ) " ( वाजसनेयी संहिता ६·१५ ) तसेच सुरीने ती गवताची काडी तोडताना म्हणतो " स्वधिते मैनं हिंसीः ( हे सुरी तू पशूला मारू नकोस " ) ( वाजसनेयी सं. ६·१५ ) · ( शतपथ ब्रा. ३·८·२·१२ · ) येथे आपणास गूढार्थाने पशूचे रक्षण करण्याचे प्रयत्न आणि त्यायोगे पशुयज्ञात अंतर्भूत असलेल्या हिंसेला सौम्य रूप देण्याचा प्रयत्न दिसतो.








(उ) **सौम्य शब्दांचा वापर**--ब्राह्मणग्रंथ प्रत्यक्षपणे "हत्या," "ठार करणे" ह्यासारख्या अर्थाचे शब्द न वापरता सौम्य शब्दांचा वापर करतात. "जहि मारय (ठार कर; मार)" असे शब्द वापरू नयेत कारण तो लौकिक व्यवहार होतो." संज्ञपय, अन्वगन् (शांत कर; तो (देवांकडे) गेला आहे) असे शब्द वापरावेत. हा दैवी व्यवहार होतो. (शतपथ ब्राह्मण ३·८·१·१५).[२]

(ऊ) **मारण्याची पद्धत वेगळी**-- प्रत्यक्ष पशु मारण्याच्या क्रियेतसुद्धा सौम्यता आणण्याचा प्रयत्न दिसतो. पशूचे तोंड दाबून त्याला मारले जाते[३]. ते नेहमीच्या पशू मारण्याच्या पद्धतीने नाही (शतपथ ब्रा. ३·८·१·१५). त्यायोगे पशूच्या ओरडण्याचा आवाज येऊ शकणार नाही ह्याची काळजी घेतलेली दिसते.

(ए) **पशूमध्ये गूढपणे जीवनार्पण**-- हिंसातत्त्व सौम्य करण्याच्या प्रक्रियेमध्ये ह्या पुढचा एक प्रयत्न म्हणजे पशूमध्ये गूढार्थाने पुनः जीवन अर्पण करण्याचा प्रयत्न जेव्हा पशू मारला जात असतो त्याचवेळी "प्राणाय स्वाहा अपानाय स्वाहा व्यानाय स्वाहा (वाजसनेयी संहिता २३·१८) असे म्हणून आहुती दिल्या जातात. ह्या आहुतींचे स्पष्टीकरण करताना असे म्हटले की मेलेल्या पशूमध्ये ह्या आहुतींच्या योगे प्राण अर्पण केले जातात; आणि पशूच्या आहुती जणू काही तो जिवंत असतानाच दिल्या जातात. (शतपथ ब्राह्मण ३·२·८·३) पशूवर पाणी शिंपडण्याचा गूढार्थही अशाच प्रकारे दिला आहे की पाणी शिंपडून पशूमध्ये प्राण अर्पण केले जातात (शतपथ ब्रा. ३·८·२·७) शतपथ ब्रा. ४·२·५·१६ मध्ये असे म्हटले आहे की जेव्हा पशूला मारले जाते तेव्हा त्याच्यामध्ये "रस" ठेवला जातो.

(ऐ) **पशू अमर होतो**-- मृत पशूमध्ये गूढपणे केवळ जीवनच अर्पण केले जाते असे नाही तर त्याला अमरत्वही दिले जाते. वपाहुतीमध्ये सोन्याच्या तुकड्याचा वापर करण्यात हाच गूढार्थ आहे. कारण सोने म्हणजे अमृतत्व. त्याच्यायोगे पशु अमृतत्वामध्ये सुप्रतिष्ठित होतो. तो येथून उठून जिवंत राहतो. (शतपथब्रा. ३·८·३·२६).

**उपसंहार**-- अशा रीतीने पशुयज्ञातील 'हिंसा' ही सौम्य करण्याकडे ब्राह्मणग्रंथाची प्रवृत्ति दिसते. भूतदया, अहिंसा वगैरेचे विचार बौद्धांनी किंवा जैनांनी आणले व त्यातूनच ते नंतरच्या हिंदु धर्मात शिरले असे नव्हे, ते विचार पूर्वीही होते. पशुयज्ञ करणाऱ्याच्या मनात पशूबद्दल दया येणेही शक्य आहे. यज्ञ करणाऱ्यानाही सदसद्बुद्धीची टोचणी होतीच. तिचे समाधान करण्यासाठी गूढार्थाने ही हिंसा हिंसाच नव्हे ती अहिंसा आहे असे ब्राह्मणग्रंथांनी सिद्ध करण्याचा प्रयत्न केला. धार्मिक कृत्यात पशूचा बळी म्हणून वापर करणे पूर्वीही होते व आजही आहे. पशुहत्या करणाऱ्यातही काहीना ही हिंसा थोडीशी खटकणे शक्य आहे व आपल्या मनाचे समाधान त्या हिंसेचे उदात्तीकरण करून ती अहिंसा आहे असे दाखवून करणे अशी प्रक्रिया आपणास ब्राह्मणग्रंथात प्रतिबिंबित झालेली दिसते.

---

२. पहा– J. J. *Meyer Triogie altihdischer Machte und Feste der Vegetation*, Zurich–Leipzig, 1937, III. p. 120. n. l.

३. पहा– *Meyer, Trilogie*, III p. 237, n. l.











मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

प्रा. मो. ज्ञा. शहाणे

# हॅनोई स्मरणयात्रा

व्हिएनतियेनच्या विमानतळावरून हॅनोईकडे विमान निघाले आणि घनदाट जंगल सुरू झाले. खाली पाहिले तर मुंगीलाही शिरता येईल की नाही अशी शंका वाटावी इतकी झाडांची दाटी. असे अरण्य मी कांगोखेरीज कोठे पाहिले नव्हते. हॅनोई जवळ येऊ लागली तेव्हा कोठे शेतीवाडी व घरे दिसू लागली. १९६० साली कम्युनिस्ट जगाबाहेरील लोकांस उत्तर व्हियेत-नाम हे एक बंद कोडेच होते. अलिकडे ते किंचित् उलगडू लागले आहे. मी अशा या गूढ प्रदेशात चाललो होतो. आशा होती की गेल्या १०।१५ वर्षात ज्यानी आपली नावे इतिहासात अजरामर केली आहेत त्यांची भेट नाही तर निदान दर्शन होण्याचा योग येईल. गुलबकावलीच्या राज्यात निघालेल्या माणसांप्रमाणेच औत्सुक्य, कुतूहल आणि भीति यानी मन व्यापले होते.

औत्सुक्य आणि कुतूहल कारण विसाव्या शतका-तील तीन युगपुरुषांपैकी एकाच्या देशात जात होतो. गांधी, माऊत्से-तुंग आणि हो ची मिन्ह. गांधीच्या देशातलाच होतो, माऊस पाहण्यास मिळेल म्हणून चीनमध्ये बदली करून घेण्याचा प्रयत्न केला होता तो जमला नव्हता आणि अन-पेक्षितरीत्या होच्या प्रदेशात नेमणूक झाली होती. पण माऊ काय किंवा हो काय, गांधी थोडेच होते की ज्याच्या खुल्या दरबारात शत्रुमित्रांना मुक्त-द्वार होते ! कम्युनिस्ट नेते जुन्या परिकथातील नायिकांप्रमाणे बंदिस्त राहतात आणि त्यांचे दर्शन घेण्यास तितकेच प्रयत्न करावे लागतात.

हॅनोई विमानतळावर उतरताना अशा विचारांची गर्दी मनात होती. तरीही ध्यानात आले की विमानतळ फारच सामान्य होता. आपल्याकडे ठिकठिकाणी आढळणाऱ्या सरकारी विश्रामगृहा-प्रमाणे बैठी कचेरी, धावपट्टीवर धक्के खात विमानाने उतरावे. पलीकडे काही अंतरावर दोनतीन मुलकी व काही लष्करी विमाने. विएतनाममधील आन्तर-राष्ट्रीय आयोगाचे नवे भारतीय अध्यक्ष व राजकीय सल्लागार येणार म्हणून थोडे अधिक अधिकारी स्वागतास होते एवढेच. एकदा टांगानिकात एका गव्हाच्या शेतात आमचे चार बैठकीचे खासगी विमान उतरवावे लागले होते, त्यावेळची आठवण व्हावी असे निर्मनुष्य आसमंत. उत्तर व्हिएतनाममधील दर्शनी व अस्सल विमानतळ निरनिराळे असतात असे ऐकले होते. कदाचित् हाही एक दर्शनी असेल की पाहाताच वाटावे हे काही शस्त्रसज्ज राष्ट्र नव्हे. आशियातील पॅरिस म्हणविणाऱ्या हॅनोईचा व देशाचा हा मुख्य विमानतळ ! छे: हा दरिद्री देश बलाढ्य पाश्चात्य देशास काय तोंड देणार !

परक्यांपासून वस्तुस्थिती लपवणे हे कम्युनिस्ट राजवटीचे मुख्य सूत्रच आहे. पण या देशात परक्या पासूनच नव्हे तर मित्रापासूनही. कारण १९४२ पासून विएतनामी राष्ट्रास शत्रु-मित्राचा एकच अनुभव आहे. पण मग डिएन-बिएन फू कसे ? हा मामलाच निराळा आहे. निसर्गाने दिलेल्या त्या दाट आवरणां-खाली हो व त्यांचे सहकारी यानी अमेरिकन शस्त्र-बलानी सुसज्ज अशा फ्रान्सचा न भूतो न भविष्यति असा पराभव कसा केला असेल ? या छोटया राष्ट्रांत इतका पीळ, मोडेन पण वाकणार नाही अशी अस्मिता कुठून आली ?

विमानतळावरून मुक्कामावर जाताना माझे मलाच हंसू आले. बलाढ्य औरंगजेबास हताश करणाऱ्या मराठ्यांच्या वंशजाला हे प्रश्न पडू नयेत. पण शतकांच्या गुलामी अनुभवात तो सोनेरी काल विसरून जातो हेच खरे. वीरांच्या कथा खूप, पण प्रथा किती अल्प. वतनाकरता जात, धर्म, वंश इतकेच नव्हे आयाबहिणीही हुजूरांच्या चरणी अर्पण करण्याची प्रथा अधिक. मोटरीतून ते सात आठ








मैल जात असता दृष्टी अनेक दृश्ये टिपून घेत होती व मन असे भरकटत होते.

आम्हाला नेणारी मोटर दहा वर्षांची तरी जुनी असावी. रस्त्यावर व शहरात अनुभव आला की १९५४ नंतर या देशाने निर्यात बंदच केली असावी. सर्व व्यवहार पायी किंवा रेडागाडी किंवा दुचाकी वरून. दुचाक्याही किती जुन्या आणि त्यांचा उपयोग किती विविध. एका दुचाकीवर इतके सामान नेता येते याची कल्पनाही नव्हती. नंतर कळले की डिएन-बिएन-फूच्या वेढ्याकरता याच दुचाक्यावरून मैदानी तोफाही जंगलातून गुप्तपणे नेल्या होत्या. गरज ही शोधाची जननी वा निर्वाहः प्रतिपन्न वस्तुपु. आमची मोटरही त्या लढाईत फ्रेंचाकडून काबीज केलेलीच होती. खाकट रंग, आतल्या बैठकीवर स्वच्छ शुभ्र अभ्रा, स्वागतमंडळाचा पोषाख मळखाऊ कपड्याचा. पँट व बंद गळ्याचा कोट. त्यास इस्त्री असेल वा नसेल. डोक्यावर सोला हॅट. लाल नदीवरील लोखंडी पूल जुनाट आणि शहरात शिरताना दिसणारी घरेही जुनाट, रंगहीन. रस्त्याने चालणाऱ्या नागरिकांचे कपडेही तसेच मातकट आणि त्यातील बरेच ठिगळे लावलेले. बायकांच्या काळ्या विजारी, मातकट खमीस आणि गवती टोप्या. हंसत खेळत गप्पा मारणारे गट नाहीतच, निदान रस्त्यावर. तसे पाहता उत्तर विएतनाम मधील शहरांतील रस्ते निर्मनुष्यच दिसतात आणि त्यावर रेंगाळणारे गट आढळणे दुर्मिळ. जणु काही सर्वांना काहीतरी ईप्सित साधावयाचे आहे, टिवल्याबावल्यास वेळ नाही.

आमची राहण्याची सोय एका बंगल्यात केलेली आहे. हॅनोई शहरांतून हजारो सुखवस्तू कुटुंबे दक्षिणेत गेली आहेत. त्यांच्या सुंदर बंगल्यात परदेशी वकिलाती, पाहुणे व सरकारी अधिकारी वा कचेऱ्या आहेत. उरलेल्यात लहान लहान कुटुंबे दाटीवाटीने राहात आहेत. आमच्या बंगल्यासमोर दिवसरात्र पहारा आहे. आमच्या संरक्षणापेक्षा त्याचे काम कोणाला आत येऊ न देणे व कोणी आल्यास त्याचे नांव पत्ता टिपणे हेच मुख्य आहे. स्वच्छता उत्तम व नोकरचाकर आदबशीर. पण हॅनोईतील आदब व सेगावमधील आदब यात किती फरक. सेगावमधला नोकर आमच्यासमोर कधीच ताठ उभा राहणार नाही व खोलीत येताना वाकून येईल. दक्षिणेकडील कणा थोडा वाकलेलाच. उत्तरेकडे तो ताठ आहे.

नंतर मला कळले की सर्व व्हिएतनाममधे सरंजामशाही इतकी हाडीमासी खिळली होती की मालकापेक्षा आपले डोके उंच राहू नये म्हणून सर्व नोकर गुडघ्यावर चालून त्यांच्यासमोर येत असत. सेगावला माझ्या कांही व्हिएतनामी मित्रांच्या घरी मी त्यांचे नोकर कसे वाकून अदबीने असत हे पाहिले होतेच. सामान्य माणसाच्या हाडीमासी खिळलेली ही स्वतःच्या क्षुद्रतेची भावना घालविण्याकरता होच्या लोकांनी एक साधा पण जालीम उपाय योजला. ज्या ज्या गावात त्याना सत्ता मिळाली त्या त्या गावातील खानदानी उच्चभ्रूना लोकन्यायालयासमोर खेचण्यात आले. आरोपींना गावातील चौकात एका खड्डयात उभे करण्यात आले. त्यामुळे त्यांच्याहून खाली डोके राहोच पण पायही राहू शकले नाहीत. उपाय रानटी, पण रोगही रानटीच होता.

असो. सकृद्दर्शनी आमच्यावर कोणतीच बंधने नव्हती. हॅनोईत कुठेही भटकण्यास आम्ही स्वतंत्र होतो. पण आमची स्थिती एखाद्या मुक्या बहिऱ्याहून चांगली नव्हती. वियतनामी व निदान फ्रेंच यापैकी कोणतीच भाषा येत नसल्याने शहरात एकटे भटकणे अशक्य होते. आमच्या दिमतीस मोटारी होत्या आणि आम्ही सांगू तिकडे जाणे त्यांचे काम होते पण अवमान न करता कोणाच्याही हालचाली कशा बंदिस्त कराव्यात याचे धडे आम्हाला मिळाले. काही ठिकाणी जाण्यास त्याना बंदी असे तर कांही ठिकाणी जाण्यास त्यांचे पेट्रोल पुरेसे नसे, कधी कधी मोटर खराबही होई !

* * *

'हाप, हुप, हाप.' सकाळच्या ११ स हा काय प्रकार आहे म्हणून कचेरीच्या दुसऱ्या मजल्यावरच्या गॅलरीत आलो तर समोरच्या दुकानातील सर्व लोक

आपल्या व्हरांड्यात येऊन व्यायाम घेत होते. रस्त्यावरही स्त्रीपुरुष रेडियोतून येणाऱ्या 'एक, दोन, तीन'च्या ठेक्यावर व्यायाम करीत होते. हमाल, गाडीवाले, विद्यार्थी, फळवाले, फुलवाले, दुकानदार, मालक, नोकर सर्व. ताठ उभे, हातपाय लांब, ओणवे, आंगठ्यास हात लावा, गुडघे वाकवू नका, पुढे हात, मागे हात, साऽवकाऽश गुडघे वाकवा, कमरेवर हात मागे वाका, सावकाश, सावकाश. आपला देश शत्रूंनी घेरलेला आहे, त्याला तोंड द्यायला सर्वांची प्रकृती ठणठणीत हवी. लहान मोठे, स्त्रीपुरुष, सर्व कॉम्रेडस एक व्हा आणि क्रांतीच्या जयजयकारात व्यायाम करा, निरोगी व्हा, बलवान व्हा आणि शत्रूस पाणी पाजा.

दुपारी चारला पुन्हा तेच.

व्यायामात भाग घेण्यास कोणी टाळाटाळ करू शकतो का ? अशक्य. एवढ्या मोठ्या शहरात प्रत्येकावर नजर ठेवणे कसे शक्य आहे ? सोपे.

सर्व नागरिक पाचांच्या पायरी पायरीने संघटित केले आहेत. तेही वसती, व्यवसाय, छंद, मनोरंजन वगैरे जीवनाच्या सर्व कक्षानुसार. उदाहरणार्थ चार माणसांचे एक कुटुंब घ्या. नवरा, बायको, एक मुलगा, एक मुलगी. प्रथम कुटुंबातील सर्व गल्लीतील पांचपांचाच्या गटात विभागले जातात. त्यानंतर पुरुष व स्त्री जो व्यवसाय करीत असतील त्या व्यवसायातील पाचाचे सदस्य होतील. नंतर पुरुष एखाद्या ग्रंथालयाचा वाचक असेल तर त्या वाचकांच्या पाचातही असेल. त्याला ज्या खेळाचा छंद असेल तेथेही पुन्हा पाचाचा गट, अशाप्रकारे स्त्री, मुले, मुली, गल्लीगट, धंदागट, छंदगट, विद्यार्थीगट, ग्राहकगट, इत्यादी व त्यावरही स्वयंसेवकगट, सैनिक गट वगैरे अनेक गटांचे एकाच वेळी सदस्य असतात. या प्रत्येक गटाच्या पाचाचा एक गट, त्या मोठ्या पाचाचा शिवाय एक गट असे निरनिराळे पिरॅमिड होऊन नागरिकाचे जीवन सदैव कोणातरी गटाच्या संबंधात जागरूक निरीक्षकाच्या नजरेखाली राहते. खासगी जीवन ही गोष्टच अशक्य होऊन गेली आहे. याशिवाय दिवसरात्र व्यक्तिपेक्षा राष्ट्र श्रेष्ठ म्हणून चाललेल्या प्रचाराचा परिणाम म्हणून पितापुत्र, मातापुत्र, बंधुभगिनी या निष्ठा सैल होऊन पुढाऱ्यांच्या आदेशाविरुद्ध वर्तन करणाऱ्या व्यक्तीचे नाव योग्य त्या ठिकाणी पोचण्यास वेळ लागत नाही.

वियतनामी स्त्रियांना विजारीकरता नाजुक कलाकुसर असलेले काळे रेशमी कापड फारच प्रिय आहे आणि उत्तर वियतनाममध्ये ते मिळणे अशक्य आहे. आमच्या तेथील एका अधिकाऱ्याच्या शोफरचे नुक्तेच लग्न झाले होते आणि त्याने असे कापड आपणास मिळेल का म्हणून सहज आपल्या मालकास विचारले. त्याच्या विनंतीवरून मी तसे कापड हॅनोईस घेऊन गेलो. शोफरच्या प्रियेला सुंदर विजार मिळाली आणि आठवड्याचे आतच त्याची रवानगी कोणत्यातरी कोळशाच्या अगर लोखंडाच्या खाणीवर झाली. अर्थात् हॅनोईतील परकीय वकिलातीतील सर्व नोकर तेथील परराष्ट्रीय कचेरीतून दिलेले असतात व आमच्या मित्रास सांगण्यात आले की त्याला 'बढती'वर पाठविण्यात आले आहे कारण लग्न झाल्याने त्याच्या जबाबदाऱ्या वाढल्या आहेत.

लालबंधूस विनोदबुद्धी नाही असे मानण्याचे कारण नाही !

अशाच विनोदबुद्धीचे एक सुंदर उदाहरण या पहिल्याच भेटीत आम्हाला मिळाले.

आन्तरराष्ट्रीय नियंत्रण आयोग हा १९५४ च्या युद्धतहकुबी कराराचे अंग असल्याने आमचा प्रत्यक्ष संबंध परराष्ट्रीय खात्याशी नसून संरक्षणखात्याशी असतो आणि आम्ही हॅनोईस प्रथमच जात असल्याने संरक्षण मंत्री विख्यात जनरल जियाप यांची भेट घेणे हे आमचे कर्तव्यच होते. त्याचप्रमाणे आम्हाला भेट देणे हे त्यांचेही कर्तव्य होते. गेल्याबरोबर आम्ही त्याप्रमाणे विनंती केली व रिवाजाप्रमाणे भेटीचा दिवस व वेळ याची सूचना येण्याची वाट पहात राहिलो. २।४ दिवस काहीच हालचाल दिसेना. मध्यंतरी इतर औपचारिक भेटीगाठी आम्ही उरकून घेतल्या. यातच तेथील ब्रिटिश कॉन्सल-जनरलचीही भेट होती. हे गृहस्थ व त्यांची पत्नी हॅनोईत कर्तव्य-बुद्धीने अडकून पडले होते. यादवी युद्धापूर्वीपासून चीन व इंडोचीनचा त्यांचा अभ्यास होता व त्या








भाषाही त्याना येत असत. म्हणून त्याना हॅनोईस नेमण्यात आले. त्या दिवसापासून त्यांचा वनवास सुरू झाला. त्यांच्याशी संपर्क ठेवणे हा राष्ट्रद्रोह झाला. त्यांची बदली करावी तर त्याचे जागेवर नेमलेल्यास हॅनोई सरकार मान्य करील की नाही ही शंका. तेव्हा हे पति–पत्नी हॅनोईत राहिले. अनेक सुप्तगुप्त प्रकारानी त्यांचे जीवन कठीण केले जात असे. पार्टीच्या दिवशीच भाजीपाला वा मांस-मच्छर न मिळणे, दूधच कमी होणे, नोकर सर्वदा बदलत राहणे वगैरे क्षुल्लक पण त्रासदायक गोष्टी घडतच असत. भेटायला जावे तर कम्युनिस्ट जगा–बाहेरील वकिलाती दोन चारहून अधिक नाहीत. तेव्हा एक प्रकारे एकान्तवासाची शिक्षा भोगीत देशसेवेच्या भावनांमुळे हे गृहस्थ हॅनोईत राहात होते. यानी आम्हाला जेवणास बोलावले व त्याच-वेळेस १ –१२ इतर लोकही बोलावले. अद्याप जनरल जियापकडून आमंत्रण नसल्याने आम्ही काय करावे या विचारात होतो. तेव्हा ब्रिटिश वकिलाने हसत हसत सांगितले की आम्ही त्याचे आमंत्रण स्वीकारले आहे असे कळल्यास संरक्षणमंत्री कदाचित् आम्हास बोलावतील, आणि झाले तसेच. ब्रिटिश पार्टीची निम्मी तयारी झाली असेल तेव्हा आम्हाला दोघानाही जनरल जियाप यांचे जेवणाचे आमंत्रण आले. दिवस व वेळ ? तोच व तीच.

लालबंधूना विनोदबुद्धी नाही असे कसे म्हणावे !

याच विनोदबुद्धीचे आणि एक उदाहरण देण्याचा मोह आवरत नाही. हॅनोईतील कचेरीत एक मोठी चुणचुणीत व सुंदर मुलगी काम करीत असे. परकीय वकीलातीत वा आयोगात काम करावयास मिळणे हा उत्तर विएतनाममध्ये स्त्रियाना मोठाच अनुग्रह आहे. कारण केस कापून बॉब करणे, फॅशनेबल कपडे करणे वगैरे इतर स्त्रियांस ( त्याकाळी ) बंदी असलेल्या गोष्टी करण्याची त्याना परवानगी असे. त्याशिवाय वकिलातीतील पार्टर्यामुळे खानपानाचे सुखही असे. यामुळे अशी नोकरी मिळालेल्या स्त्रिया खास विश्वासातील असतात. हुशारही असतात. कारण परक्या वकिलातीत कागद नक्कलणे किंवा नोंदी करणे या पलिकडेही कामे त्याना करावी लागत असतील यात शंका नाही.

असो. या मुलीवर आयोगातील एका तरुणाचे प्रेम बसले. तरुणीकडून प्रतिसाद मिळाल्यावर त्याने नियमानुसार आपल्या सरकारकडे या विवाहास परवानगी मागितली व काही काळाने ती मिळालीही, मध्यंतरी त्याची बदली दुसरीकडे झालेली होती व मुलीने आपल्या सरकारकडे मागितलेली परवानगी यावयाची होती. ती येण्यास एक दोन वर्षे लागली. ती मिळाली, पण एका अटीवर. या मुलीवर तिच्या कुटुंबाची– अकरा माणसे– जबाबदारी होती, तेव्हा तिने आपल्या बरोबर सर्व कुटुंब घेऊन जावे !

या प्रकारानंतर मी पुन्हा हॅनोईस गेलो तेव्हा सदर तरुणी आमच्या कचेरीत नव्हती. काही दिवसानी ती एका कोपऱ्यातल्या पुस्तकांच्या लहान दुकानात विक्रेती म्हणून आढळली. मलूल केस, मलूल मुद्रा, कळकट कपडे, उदास चेहरा, भकास जीवन.

ही कथा सांगताना मधेच माझ्या डोळ्यासमोर एक चित्र येते. आमच्या सैनिकांच्या बराकीत काही बांधकाम सुरू होते. ते पाहण्यास आम्ही गेलो असता चुनाविटा वाहणाऱ्यामध्ये एका वयस्क मजूराचा चेहरा चांगल्या खानदानी घराण्यातील माणसाप्रमाणे दिसला. आमच्यापैकी एक म्हणाला 'बिचारा एखादा पाखंडी प्रोफेसर असावा'. मला क्षणभर वाटले की त्या मजुराचे डोळे एकदम काही विचाराने चमकले, दुसऱ्याच क्षणी तो खाली मान घालून कामात गर्क झाला. कदाचित् त्याला इंग्रजी येत असावे.

* * *

जनरल जियापकडचा भोजनसमारंभ स्मरणीय होता. जेवणास आम्ही सात आठजणच होतो, पण चिनी व वियतनामी पक्वान्नांची रेलचेल होती. जेवणाची पद्धतही चिनीच. म्हणजे चॉपकाडचानी. पाश्चात्य काटे चमचे सुऱ्या याच चॉपकाडचांची विकसित आवृत्ती आहे हे ध्यानात ठेवण्यासारखे आहे. उत्कृष्ट चिनीमातीची भांडी, उत्तमोत्तम मद्ये.








जनरलसाहेब आग्रह करून वाढत होते. फ्रेंच साम्राज्याला पाणी पाजणारा व आता अमेरिकेच्या सुसज्ज बलाढ्य सैन्यास दे माय धरणी ठाय करणारा हा वीर पुरुष मुलकी पोषाखात एखाद्या मोठ्या वस्त्रभांडाराचा गोरा, गोल, हंसतमुख विक्रेता वाटावा. हंसरे डोळे, मृदु भाषण, सौजन्यपूर्ण वागणूक. भोजनास फ्रेंच संगीताची मधुर पार्श्वभूमी. दररोज शेंकडो तरुणतरुणीस मृत्यूच्या जवड्यात पाठविणारा, दक्षिण वियतनामातील घरे, कुटुंबे खेडीच्या खेडी उध्वस्त करणारा हाच का तो पोलादी क्रूर पुरुष !

* * * *

जेवताना जनरलसाहेबांनी कॉलेजमधे असता त्यांच्या फ्रेंच शिक्षकाने त्याना सहलीची आवड कशी लावली, त्यामुळे वियतनामच्या जंगलातील दऱ्याखोरी व वाटा आपल्यास कशा माहीत झाल्या व त्याचा उपयोग स्वातंत्र्य युद्धात किती झाला याचे रसभरीत वर्णन केले. त्यातच जपानचा पराभव झाल्यावर फ्रेंचाना त्या देशात आपले स्वामित्व पुन्हां प्रस्थापित करण्याकरता ब्रिटिशानी कशी मदत केली हेही सांगितले आणि बोलता बोलता त्या ब्रिटिश सैन्यात मुख्यतः हिंदी सैनिकच होते आणि सेंगावच्या चौकांत त्यानी वियतनामी देशभक्तांवर गोळीबार केल्याचाही उल्लेख केला. यात काय उद्देश असेल तो असो पण मला राहवले नाही आणि मी लगेच नेहरूंनी त्याचा कसा जळजळीत निषेध केला होता त्याची नम्रतापूर्वक आठवण दिली. जियाप प्रसन्नतेने म्हणाले : " म्हणूनच नेहरू आम्हास इतके आवडतात."

गेल्या युद्धातील हिंदी सैन्याच्या पराक्रमाच्या कथा सांगताना त्यांचा उपयोग इंडोनेशिया व इंडोचीनमधे परकी सत्ता पुनस्थापनेकरता केला गेला ही लाजिरवाणी बाजू विसरून चालणार नाही. त्या देशातील नागरिकांना भारतीय दिसला की या संतापजनक गोष्टीची आठवण होणे साहजिक आहे आणि स्वतंत्र भारतांचे नागरिक व परतंत्रतेतील नागरिक यामधे फरक करणे सामान्यास सुचत नसेल तर त्याबद्दल आश्चर्यही वाटण्याचे कारण नाही. हे पाप धुवून काढण्याचे आटोकाट प्रयत्न नेहरूंनी जीव तोडून केले म्हणून आज आपणास त्या देशात येऊ तरी देतात. क्षमा सोपी आहे, विस्मृती महाकठीण.

जनरल जियाप इतरेजनास क्वचितच दिसतात. त्यामुळे मी संभाषणात फारसा भाग न घेता त्याना डोळ्यानी टिपून घेत होतो, स्मृतीत साठवीत होतो. कारण साठी ठेपली असूनही वीरपूजनाचे बाबतीत मी विशीचा भाविकच होतो. अद्यापही आहे.

लाल राजवटीत अग्रभागी असणाऱ्या लोकांचे खाजगी जीवन, नव्हे खरे नावही, इतरास समजणे कठीण. त्यामुळे जियाप यांच्याबरोबर चार तास घालवूनही त्यांचे कुटुंब केवढे आहे, कुठे आहे किंवा घर कसे आहे याचा आम्हांला पत्ता लागला नाही. कारण या पुढाऱ्यांचा पाहुणचार त्यांच्या घरी नसतोच. तो त्याचकरता राखून ठेवलेल्या एका छोटया बंगलीत असतो व सर्व व्यवस्था 'सरकारी' असते.

* * *

जनरल जियापची भेट झाली पण हो ची मिन्हचे काय ? योगायोगाने आक्टोबरमधील चीनच्या राष्ट्रीय दिन सोहळ्यास आम्ही हॅनोईतच होतो. चिनी वकीलातीने त्यावर्षी (१९६०) हॅनोईत मोठा समारंभ केला. ते दिवस 'भाईपणाचे' तेव्हा आमचे स्वागत सन्मानाने झाले व 'खास' पाहुण्यात आम्ही गेलो. वकिलातीचा विस्तीर्ण परिसर रोषणाईने उजळून निघाला. हॅनोईत पाहण्यास मिळणे मुष्कील ती सफरचंदे खास विमानाने आपल्या देशातून आणवली व वकिलातीच्या अंगणात त्याचा डोंगर रचला. विजेच्या प्रकाशात ती रसरशीत पुष्ट फळे आपल्या तांबड्या पिवळ्या रंगात चमकत होती. उचला, खा व घरीही न्या. आणि पाहुणे नेत होतेही. वकिलातीतील त ण सेवक हसत हसत निरनिराळ्या भाषेत आम्हाला उत्तेजनही देत होते. हिंदी, इंग्रजी, फ्रेंच, वियतनामी, रशियन, पोलीश आणि अर्थातच चिनी. प्रत्येक भाषा बोलणारे सेवक होते.








परंतु सफरचंदापेक्षाही सर्वांना आकर्षण होते एकच. चाचा हो समारंभास येतील का ? त्यांच्याशी संभाषण होईल का ? हस्तांदोलन करता येईल का ? कारण त्यांचे दर्शन परकीयास दुर्मिळ. आधी आम्हास सांगण्यात आले होते की होचीमिन्ह येणार नाहीत. पण आशा होती की येतील, कारण चिनी साहाय्यावर तर त्यांचे सामर्थ्य अवलंबून तेव्हा त्यांच्या आमंत्रणाचा अनादर ते कसा करतील ! वकिलातीच्या प्रांगणात, दिवाणखान्यात व काही खास खोल्यातून आम्ही हिंडत होतो. चिनी राष्ट्रास शुभेच्छा देण्याची वेळ आली. सर्वांचे मद्याचे प्याले पुन्हा भरण्यात आले. एका खोलीत शंभरएक जरा वरच्या दर्जाचे परक्या वकिलातींचे अधिकारी जमले व शुभेच्छा– टोस्ट– क्षण आला. चिनी वकिलानी व त्याच्या अधिकाऱ्यानी पाहुण्यांच्या प्यालाना आपल्या प्यालयांचा क्षणस्पर्श करावयास सुरवात केली, इतक्यात खोलीच्या एका कोपऱ्यातील लहानसे दार उघडले व त्या आसपास गपकन शांतता झाली. ती बोलकी शांतता दूर उभा असलेल्या माझ्या वर्तुळापर्यंत क्षणात पोचली व काय झाले हे पाहण्याकरता आम्ही तिकडे माना उंचावून पाहू लागलो तर विनोबांची आठवण देईल अशा विस्कळीत दाढीची, टक्कल पडलेली, काहीतरी दूर गहन विचार करीत असतां चुकून भलत्याच ठिकाणी आलेल्या व्यक्तीचा भाव डोळचात असलेली, घरीच वारंवार धुतल्याप्रमाणे दिसणारा बंद गळचाचा साधा, किंचित मळखाऊ सूट घातलेली एक बटुमूर्ति दारातून आत येत होती. क्षणभर सर्व श्वास बंद झाल्याचा भास झाला. होची मिन्हनी सर्वांकडे पाहून हास्य केले व श्वासोच्छ्वास पुन्हा सुरू झाला. एखाद्या मोरपिसाने मानेस हलकाच स्पर्श व्हावा तसे माझे अंग समाधानाने शहारून आले. १९१८ साली लोकमान्य आणि १९२० साली गांधिजी यांचे दर्शन झाले त्या क्षणाची आठवण झाली.

दुतर्फा अदबीने उभे असलेल्या लोकांशी क्षण दोन क्षण थांबत थांबत होचीमिन्ह येत असता भारतीय राष्ट्रीय पोषाखांतील माझ्याकडे त्यांचे लक्ष गेले. माझ्याजवळ येऊन चषकस्पर्श करून हो म्हणाले: ‘ माझी पुतणी कशी काय आहे ? ’ क्षणभर मी गोंधळलो. मग एकदम प्रकाश पडला की चाचा हो नेहरूंच्या कन्येबद्दल विचारताहेत. सुदैवाने वियतनामला येण्यापूर्वी मी श्रीनगरला होतो तेव्हा इंदिराजी– फिरोज गांधी आपल्या मुलांसह विश्रांतीस आल्या असता त्याना अनेकदा जवळून पाहण्याचा योग आला होता आणि मी प्रामाणिकपणे सांगू शकलो की त्या कुशल आहेत.

औपचारिक प्रसंग, औपचारिकच प्रश्न. पण त्याचे स्वरूप किती घरगुती होते.

बस्स. अखेर आमचे घोडे हॅनोईच्या गंगेत न्हाले.

एखाद्या वियतनामी गर्दीत हो ची मिन्हना हुडकून काढणे सोपे झाले नसते. राष्ट्रपुरुषाची आपल्यासमोर मूर्ति असते ती त्यांच्या अवास्तव स्वरूपातील पुतळचामुळे यांत शंका नाही. नाहीतर नेपोलिन, शिवाजी, टिळक, गांधी, नेहरू, हो ची मिन्ह हे किती ठेंगू आहेत ! मी नेहरूंचा विचार करी तेव्हा त्यांची उंची ध्यानातच येत नसे शेवटी एकदा नागपुरला त्याना व नेताजीना एकत्र पाहाण्याचा योग आला तेव्हा ते किती ठेंगू आहेत हे लक्षांत आले. नाही म्हणावयास लोकोत्तर पुरुषांत लिंकन व बादशहाखान हे शारीरिक उंचीने आपल्या गुणाशी समतुल्य आहेत. कीर्तीने महान असलेल्या बहुतेक मूर्ति उंचीने लहानच दिसतात.

* * *

हॅनोईचे राष्ट्रपतीभुवन फ्रेंच गव्हर्नर जनरलचे जुने वसतिस्थान. ते विस्तीर्ण उद्यानात भव्य दिसते. पण हो चि मिन्ह त्यात राहात नसत. त्यांची वसती वाडचामागील माळचाच्या बंगलीत असे. त्याना बागेचा षोक असल्याने एकापरी ते योग्यच होते. ब्रिटिशांकडून स्वातंत्र्याची देणगी तशी आम्हाला सुखासमाधानातच मिळाली. स्वातंत्र्यलढचापूर्वी इतर देशांत जे क्रांतीचे रौद्र स्वरूप दिसते ते काही आपल्यास दिसले नाही. म्हणून जेत्यांच्या राजकीय व सामाजिक प्रथाही आपण घेतल्या. जेत्यानी जिताना निःसत्त्व व नामोहरम करण्याकरता योजिलेली सारी अवडंबरे. हा डामडौल व देखावा








वर्षानुवर्षे लपतछपत, भुकेकंगाल अवस्थेत, झोपडपट्टीत वा रानावनात व कित्येकदा तुरुंगाच्या छळवादात काढलेल्या क्रांतिकारकाना आवश्यक वाटत नाही यात आश्चर्य नाही. हो ची मिन्ह सारख्याना हा पेंढा भरून उभे राहावे लागत नाही. गांधिजीना कुठे हे लागले, मग त्यामुळे प्राणार्पण झाले तरी पर्वा नाही.

पुढे काही महिन्यानी हो ची मिन्ह यांचे जन्मस्थान पाहण्याचा सुयोग आला. कोंकणातील किंवा बंगालमधील ५०।१०० वस्तीच्या गावाची आठवण देणारे ते खेडे व त्यांतील एक धाब्याची झोपडी. खेडे व झोपडी स्वच्छ ठेवण्यापलिकडे तेथे कोणताही डामडौल नाही. ती झोपडी, त्यातील ती जुनीपुराणी भांडीकुंडी व पलंग हेच त्यांचे कीर्तिमंदिर. पण कित्येक भव्य स्मारकांपेक्षा त्याचे स्वरूप शांत, स्वच्छ व पावन वाटावे असे वातावरण. त्यामुळे त्या चंद्रमौळी झोपडीत गेल्यावर एकदम पाहुण्यांचा स्वर खाली येतो, पावले आदबशीर पडू लागतात. जणू काही एखाद्या भव्य चर्चमधे आपण आहो. मला पुण्यातील कस्तुरबा व महादेवभाई यांच्या समाधिस्थानाभोवतालच्या भिकार वातावरणाची आठवण झाली; फार वर्षापूर्वी पाहिलेली शिवछत्रपतींची समाधी स्मरली आणि मन शरमून गेले.

* * *

प्रश्न आहे कशास महत्व द्यायचे, प्राथम्य द्यायचे. व्हिन हे उत्तर वियतनाममधील शहर आठवते. हे एक चांगल्यापैकी बंदर व व्यापारी गाव होते. तेथे भारतीय व्यापारीही पुष्कळ होते. वियतनामच्या स्वातंत्र्यलढ्यात फ्रेंचानी ते बेचिराख केले. कोणी म्हणतात जियापने केले. काहीही असो, आम्ही जेव्हा व्हिनला भेट दिली तेव्हा त्याचे स्वरूप पाहून थक्क झालो. कारण रुंद वृक्षाच्छादित रस्त्याच्या दुतर्फा भक्कम दगडी जोत्यावर धाब्याची घरे. व्हिनच्या मेयरनी आम्हाला मेजवानी दिली. टेबल, खुर्च्या, आवरणे, कपबशा, कांटे चमचे व खाद्यपदार्थ राजेशाही पण ज्या दिवाणखान्यात भोजनसमारंभ त्याच्या भिंती कुडाच्या व छप्पर धाब्याचे ! आमचे कुतूहल पाहून मेयरने सांगितले की १९४४ ते १९५४ वियतनाममधे जपानी, फ्रेंच, इंग्रज, अमेरिकन सैन्ये आली व नंतर त्यात वियतनामी स्वातंत्र्य सैनिकांची भर पडली. या यादवीत अनेक शहरे उध्वस्त झाली. ती सर्व बांधायला सामुग्री आणायची कोठून. तेव्हा ठरवले की प्रथम रुग्णालये, शाळा अशा इमारतीना अग्रक्रम, नंतर घरातील संडास, न्हाणी, स्वैंपाकघर, जरूर असेल तेथे कारखानेही आधी– अशाकरता विटा, सिमेंट, लोखंड हे वापरायचे. त्यामुळे आम्ही गेलो तेव्हा व्हिनच्या रुंद मध्य पथाभोवती जी घरे, दुकाने होती ती अशी अर्धवट विटासिमेंट व अर्धवट वांबूमाती यानी बांधलेली होती. हिंदुस्थानातून गेलेल्या कोणत्याही माणसास मुंबई कलकत्त्यातील करुण झोपडपट्टीजवळच क्रूर औद्धत्याने उभारलेल्या अलिशाही इमारती डोळ्यासमोर आल्याखेरीज कशा राहतील !

* * *

कपडालत्ता, खाणेपिणे यातील उणीवाशी सतत झगडणारे वियतनामी नागरिक परक्यांना आपल्या देशातून हाकलण्याकरता इतक्या निकराने कसे लढू शकतात. हा पीळ, ही जिद्द त्यांच्यात कोठून आली ? इतिहास सांगतो की चिनी नेत्याशी वियतनामने सतत हजार वर्षे झगडा केला. मोर्डतील पण वाकणार नाहीत. या कडक वृत्तीची जोपासना फार लहानपणापासून होत असावी. एकदा आमच्या बंगलीतून बाहेर येत असता रस्त्यात काहीं मुले खेळताना आढळली. माझ्या खिशात चाकोलेटच्या काही वड्या होत्या. जवळच्याच एका पांचसहा वर्षाच्या मुलास मी एक वडी दिली. ती त्याने तोंडात घालायला हात वर केला तोच त्यातील एक दहाबारा वर्षाचा मुलगा धावत आला आणि त्याने त्याच्या हातावर थप्पड मारून ती वडी गटारात भिरकावून दिली. रागाने तो थरथरत होता, राग माझ्यावर नव्हता. मी कोण ? एक अजाण परका. पण कोणाही परक्याकडून खाऊ घेण्यास ते काय भिकारी राष्ट्र होते. आपला हात खाऊ घेण्यास पुढे करून त्या लहानग्याने जणू सबंध राष्ट्राचाच अपमान केला अशा आवेशाने तो छोटा 'नेता' त्याला 'समजा-










वीत' होता. इतक्यात बंगल्यावर पहारा करणारा बंदुकधारीही आला आणि माझ्याकडे रागाने पाहून त्या निष्पाप मुलाला त्याने थप्पड दिली. खुद्द मलाच थप्पड बसल्याप्रमाणे मी विरघळून गेलो. राष्ट्राची अस्मिता जोपासण्याची, परकीय गुलामीतील लाचारीच्या सवयी घालविण्याची कोण ही धडपड! नंतर मला समजले की वियतनामच्या चारित्र्य संवर्धनाकरता हो ची मिन्ह अशा बारिकसारीक गोष्टीत स्वतः नियम घालून देत असत. कथा, कीर्तने, नाटय, चित्र, शाळा, रेडिओ सर्वांमधून अभिमानाने कसे जगावे, महत्त्वाचे काय, टाकाऊ काय याचे सतत शिक्षण मिळत असे. याचबरोबर काटकपणा व सोशिकपणा वाढविण्याकडेही जागरूक रहात असत. याचमुळे सकृद्दर्शनी नाजूक दिसणारे वियतनामी लोक अपार कष्ट करताना दिसले. तसेच शारीरिक दुःख सहन करण्यामधेही त्यांनी पराकोटी गाठली असावी. एकदा बाँबमुळे सबंध कोथळा बाहेर आलेला आपल्या ओंजळीत दाबून धरून रुग्णवाहिकेची शांतपणे वाट पहात असलेला तरुण मी पाहिला. बंदुका किंवा बाँबमुळे जखमी झालेले लोक हूं कीं चू न करता पडलेले मी स्वतः पाहिले आहेत.

परक्या व त्यांच्या दृष्टीने भांडवलशाही देशातील लोकांना उत्तर वियतनाममधे चमत्कारिक वाटत असेल यात शंकाच नाही. तरीही पाश्चात्य आक्रमकांना इतका निकराचा लढा दुसऱ्या कोणी दिलेला नाही, हेही विसरता येत नाही. अक्षय जागरूकता आणि अपार त्याग हे स्वातंत्र्याचे मोल होय याचे प्रात्यक्षिकच हॅनोईत मिळते.

---











"बँक ऑफ इंडियाकडे
का विचारणा
करीत नाही...?"






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष



अनुक्रमणिका

प्रा. डॉ. गार्गी सरदेसाई

# अर्वाचीन मराठीतील शास्त्रीय वाङ्मय : ( १८७० ते १९२० )

### शिक्षण-पद्धती आणि माध्यमाचा प्रश्न

एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धात जे शास्त्रीय वाङमय निर्माण झाले त्याची बीजे तत्कालीन शैक्षणिक ध्येयदृष्टीतच बहुतांशी रुजली होती; जोपर्यंत शिक्षणाचे माध्यम मातृभाषा हे असे तोपर्यंत शिक्षणक्रमात नेमलेल्या अनेक विषयांच्या अनुरोधाने मराठीमध्ये वेगवेगळ्या शास्त्रीय विषयावर ही ग्रंथ-निर्मिती झाल्याचे दिसून येते.

१८५७ साली मुंबई विद्यापीठ स्थापन झाले. १८५४ मध्ये प्रसिद्ध झालेल्या वुडच्या खलित्याने शिक्षणाचे माध्यम मातृभाषा हे असावे ही भूमिका स्वीकारली होती. या संबंधीचा उल्लेख भारतातील शिक्षणाचा इतिहास लिहिणाचा काही ग्रंथकारांनी केला आहे. त्यांनी नमूद केलेल्या तपशिलावरून असे दिसते की १८४० सालानंतर शिक्षणाचे माध्यम कोणते असावे याविषयीच्या भूमिकेत सरकारी व बिनसरकारी विचारसरणीतील मतभेद अधिकाधिक तीव्र होऊ लागला, परिणामी मातृभाषांच्या शिक्षण-क्रमाची उपेक्षा होऊ लागली. तेव्हा जी विद्यापीठे स्थापन होत होती त्यातून मातृभाषाचे शिक्षक नेमण्याची, त्यातून शिक्षण देण्याची व या रीतीने त्यांचा विकास घडवून आणण्याची वुडच्या खलित्याने व्यक्त केलेली अपेक्षा फलद्रूप होण्याचे चिन्ह दिसले नाही. मद्रास विद्यापीठ वगळले तर इतर साऱ्या विद्यापीठातून, विद्यापीठीय अभ्यासक्रमातून एकतर मातृभाषा पूर्णपणे वगळल्या जात अथवा त्याना दुय्यम स्थान मिळे. यासंबंधीचा तपशील इंडियन युनिव्हर्सिटी कमिशनच्या १९०२ सालच्या[१] रिपोर्टात पहावयास मिळतो:

Madras University also added option of a modern Indian language at the Intermediate and B. A. level. Except in Madras the study of modern Indian languages was neglected in the ordinary courses of the University. The Punjab University occupies a pecular position in that it recognises University teaching through the medium of the vernaculars as part of its system, It confers the degree of B. A. or M. A. of Oriental Learning on candidates who have gone through a course of training analogous to that prescribed for the B. A. or M. A. courses on the English side ...... through the medium of vernacular (Urdu). This University felt the want of capable teachers to teach Western learning to their pupils throuth vernaculars ... ... ...

According to the first regulation of the University (University of Bombay) a modern Indian language could be taken up as a subject from the Matriculation to the B. A. examination. In 1862, however, Sir Alexander Grant, the then Director of Public Instruction, moved in the Senate that all modern Indian languages should be removed from all University exa-

१. S. Narulla and J. P. Naik "University and Secondary Education" *History of Education in India*, second reviced edition 1951, Pages 291–292








minations except the matriculation ( where also their study was optional and not compulsory ).

In support of his resolution Sir Alexander Grant argued that ( a ) the books available in Marathi ( on any other modern Indian language ) were of so low a standard that to prescribe them for the B. A. examination would be like prescribing "Jack the Giant-killer" for the Graduat's examination at Cambridge or Oxford ( b ) that it is hardly worth while to study the old poets who have written in these languages for University examinations ( c ) that it is no duty of the University to develop the modern Indian languages ...... ...

या भूमिकेनुसार मातृभाषांची– मॅट्रिक्युलेशनच्या परीक्षेव्यतिरिक्त– जेथे या विषयाला ऐच्छिक म्हणून वाव होता– विद्यापीठीय श्रेणीतील सर्व परीक्षांतून उठावणी झाली. याचा परिणाम असा झाला की, दुय्यम शिक्षणात ४ थ्या ते ७ व्या इयत्तेपर्यंत मातृभाषांची हेळसांड होऊ लागली. विद्यापीठाच्या परीक्षामध्ये मातृभाषांना वाव नसल्यामुळे महाविद्यालयातून हा विषय शिकविला जात नसे.

या वस्तुस्थितीचा परिणाम असा झाला की, विद्यापीठातून पदवीधर होऊन बाहेर पडणाऱ्या नव्या सुशिक्षितांकडूनही मातृभाषेच्या अभ्यासाची हेळसांड होऊ लागली. या कारणामुळे मराठीतील शास्त्रीय विषयावर लिहिल्या गेलेल्या ग्रंथांचे प्रमाणही घटू लागले.

## विद्यापीठातील अभ्यासक्रमात मातृभाषांचा प्रवेश

यानंतरच्या काळात मातृभाषांना पुनश्च विद्यापीठाच्या अभ्यासक्रमात स्थान मिळावे म्हणून प्रयत्न होऊ लागले. पहिला प्रयत्न १८७० मध्ये त्यावेळचे शाळाखात्याचे मुख्याधिकारी जे. बी. पिलाअी यांनी केला. १८८७ मध्ये त्याच दिशेने कित्येक संस्थांनी प्रयत्न केले.[1] त्यात पुण्याची 'सार्वजनिक सभा', 'गुजराथ व्हर्नाक्युलर सोसायटी', 'कन्नड ॲसोसिअेशन' अित्यादि संस्थांचा समावेश होतो. १८९२ मध्ये त्यावेळच्या भारतमंत्र्यांनी देखील असे सुचविले की, शिक्षणाच्या धोरणाचा फेरविचार व्हावा. प्रत्येकवेळी जुनाच प्रश्न डोके वर काढी आणि मातृभाषांचा विद्यापीठामध्ये प्रवेश करविण्याचा प्रश्न पुन्हा पुन्हा निकालात काढला जाई. अशारीतीने वेळोवेळी चाललेल्या संघर्षानंतर विद्यापीठाच्या अभ्यासक्रमात मातृभाषांचा अंतर्भाव होणे इष्ट आहे या दृष्टीने विचार करणारा आणि हा प्रश्न विद्यापीठाच्या पातळीवर पुनश्च विचारात घेणारा एक सुशिक्षितांचा वर्ग निर्माण होत होता. एकोणिसाव्या शतकामध्ये मातृभाषांना विद्यापीठाच्या अभ्यासक्रमात स्थान मिळावे म्हणून निकडीचे प्रयत्न करून त्यात यश मिळविणारांमध्ये न्या. रानडे यांचे नाव अग्रभागी आहे.

१९०१ मध्ये अेम. अे. च्या परीक्षेमध्ये मातृभाषांना एक विषय म्हणून स्थान मिळाले. मुंबई विद्यापीठाच्या अभ्यासक्रमाबाबत दीर्घ कालावधीपर्यंत चालू असलेल्या या संघर्षाचा आढावा लक्षात घेतला म्हणजे वुडच्या खलित्याकडे दुर्लक्ष करून भारतातील अनेक विद्यापीठांच्या अभ्यासक्रमामध्ये मातृभाषांकडे कसे दुर्लक्ष झाले होते हे लक्षात येते. विद्यापीठाच्या अभ्यासक्रमामध्ये मातृभाषांना स्थान नसल्यामुळे १८७० नंतरच्या मराठीतील शास्त्रीय वाङमयाच्या निर्मितीवर प्रतिकूल परिणाम दिसू लागला. याचा दुसरा परिणाम असा झाला की सुशिक्षित वर्ग आणि सामान्य जनता यांच्यामधील अेकंदर वैचारिक अंतर अतिशय वाढले.

मातृभाषांना अेक स्वतंत्र विषय म्हणून विद्यापीठामध्ये वाव मिळण्याचाच जेथे संभव नव्हता तेथे शिक्षणाचे माध्यम म्हणून मातृभाषांचा विचार होणे किती अशक्यप्राय होते हे सहज लक्षात यावे.

१. तत्रैव पृ. २९३










या काळात मुंबई व बंगाल येथे वैद्यक शास्त्राचे शिक्षण देणाऱ्या संस्था मातृभाषेतून या विषयाचे अध्यापन करीत असत. वैद्यक खात्यातील दुय्यम अधिकाऱ्यांना कांही शिक्षण मिळावे या हेतूने त्या सुरू करण्यात आल्या होत्या. येथे मातृभाषातून शिक्षण देण्याच्या निमित्ताने त्या संस्थांनी मातृभाषातून काही पुस्तके देखील वैद्यक विषयावर लिहून घेतली.

मुंबअीतील 'ग्रँट मेडिकल कॉलेज' या संस्थेतील कित्येक नामांकित डॉक्टरांनी वैद्यक विषयक अनेक पुस्तके लिहिली. त्यात डॉ. नारायण दाजी, डॉ. सखाराम अर्जुन अित्यादिकांची नांवे ऊल्लेखनीय ठरतात. येथील वैद्यकीय शिक्षणाचे मानही बरेच उच्च असे. हा एकंदर अभ्यासक्रम लोकोपयोगी व्हावा म्हणून जगन्नाथ शंकरशेट व त्यावेळचे मुंबई-तील इतर काही नागरिक यांनी तो अभ्यासक्रम निवडणारास छात्रवृत्त्याही ठेवल्या होत्या. या काळात मातृभाषांची उपेक्षा करणारा दुसरा मोठा सरकारी धोरणाचा प्रवाह वाढतच होता. वैद्यक खात्यातील अधिकाऱ्यांनी सामान्यतः या उपक्रमाची निर्भर्त्सना सुरू केली. या प्रतिकूल वातावरणात १८८० च्या सुमारास मातृभाषातून वैद्यकाचे शिक्षण देणारा अभ्यासक्रम आपोआप बंद पडला. या दिशेने मातृभाषेतून विविध शास्त्रीय विषयांचे शिक्षण देणारे प्रयत्न वाढीला लागले असते. विद्यापीठांनी मातृभाषांचा शिक्षणाचे माध्यम म्हणून स्वीकार केला असता तर निरनिराळ्या शास्त्रीय विषयावरील ग्रंथांचे यानंतरच्या कालात घटत चाललेले प्रमाण निश्चित अधिक वाढले असते. त्यांतील विषयाच्या निरूपणात सरावामुळे अधिकाधिक सुलभताही आली असती. परिभाषेचा प्रयत्न आज पुनश्च ज्या रीतीने विद्वानांना आणि शिक्षणतज्ञांना भेडसावीत आहे तशी परिस्थितीही निर्माण झाली नसती. मातृभाषेचे माध्यम विद्यापीठानी तेव्हाच आपल्या विविध अभ्यासक्रमात स्वीकारले असते तर आज वेगवेगळ्या शास्त्रीय विषयावर प्रगल्भ स्वरूपाचे ग्रंथ अुपलब्ध नसल्याची जी एक मोठी अुणीव विद्यापीठातील शिक्षणाचे माध्यम मातृभाषा स्वीकारण्याच्या मार्गात आड येत आहे तिचे आपोआप निराकरण झाले असते. असो.

### विद्यापीठातील इंग्रजी माध्यम व शास्त्रीय विषयावरील ग्रंथनिर्मिती :–

विद्यापीठाचे माध्यम इंग्रजी झाल्यामुळे विद्यापीठातून बाहेर पडणारा वर्ग विज्ञानाचे अध्ययन व अवांतर वाचनही इंग्रजीतूनच करीत असे. स्वाभाविकच या निमित्ताने होणारी मातृभाषांतील वाङ्मय-निर्मिती संपुष्टात आली. सामान्य वाचकांपैकी ज्यांचा इंग्रजीचा अुत्कृष्ट परिचय असे अशाप्रकारचे वाचक आपली वाचनाभिलाषा इंग्रजी ग्रंथांच्या द्वारा पूर्ण करीत. या साऱ्या वस्तुस्थितीच्या परिणामी मराठीतील विज्ञानविषयक वाङ्मयाची निर्मिती १८७० नंतरच्या काळात घडल्यावाचून राहिली नाही. निरनिराळ्या शास्त्रीय विषयावरील ग्रंथ-निर्मितीच्या टक्केवारीचे प्रमाण पाहिल्यास ते पुढीलप्रमाणे दिसून येते–

यासंबंधीची कल्पना देणारा विज्ञानविषयाचा एक तक्ता[१] गेल्या ३०–४० वर्षात गाढ व्यासंग करणारे एक ख्यातनाम विद्वान डॉ. गो. रा. परांजपे यानी पूर्वीच तयार केला आहे. तो पुढील पानात देत आहो.

### १८७० पूर्वीच्या शास्त्रीय वाङ्मयाच्या निर्मितीची पार्श्वभूमी

१८२२ नंतरच्या काळात इंग्रजी शिक्षणास प्रारंभ होऊन अनेक विषयांचे अध्यापन मराठीतून होऊ लागले होते. पदार्थविज्ञान, रसायन, ज्योतिष, भूगोल, खगोल, अंकगणित, बीजगणित यासारखे अनेक विषय मराठीतून शिकविले जात. स्वाभाविकच विद्यार्थ्यांना उपयुक्त होतील अशा प्रकारची या-विषयावरील पुस्तके नेटिव अेज्युकेशन सोसायटीने प्रसिद्ध केलेल्या पत्रकानुसार सतत प्रसिद्ध होत होती. शिवाय ग्रँट मेडिकल कॉलेजमध्येही वैद्यक विषय मराठीतून शिकविले जात. त्याठिकाणी अध्यापन

१. डॉ. गो. रा. परांजपे 'मराठीतील शास्त्रीय वाङ्मय' **सृष्टिज्ञान मासिक** (भारतीय भाषा-विकासपरिषद विशेषांक) महाराष्ट्र परिचय– खंड १ ला १९५४पृ. ४०२

### मराठीतील शास्त्रीय ग्रंथनिर्मिति (१८००–१९५२)

| | १८००<br>१८५० | १८५१<br>१९०० | १९०१<br>१९१० | १९११<br>१९२० | १९२१<br>१९३० | १९३१<br>१९३७ | १९३८<br>१९४२ | १९४३<br>१९४७ | १९४८<br>१९५० | एकूण | % |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| विज्ञान | २ | १३ | ३ | ६ | १४ | १० | — | २ | १ | ५१ | ०·२२ |
| अंकगणित | ६ | २२ | ८ | ७ | २६ | ८२ | ३७ | ७१ | ६८ | ३२७ | १४· ४ |
| बीजगणित | ३ | ६ | — | ३ | ५ | १४ | ९ | ५ | १० | ५५ | ०·२४ |
| भूमिति | २ | ७ | — | १ | ८ | ७ | २७ | ११ | २० | ८३ | ०·३४ |
| त्रिकोणमिति | १ | २ | — | १ | — | — | — | — | — | ४ | ०·०२ |
| ज्योतिष | ७ | ४४ | १४ | ८ | १५ | ८ | — | १ | ३ | १०० | ४·१० |
| पदार्थविज्ञान | ४ | ३१ | १ | ४ | १४ | १३ | ३६ | ३९ | ४८ | १९० | ८·२८ |
| रसायन | २ | २१ | ३ | ३ | ७ | ३ | १५ | ९ | १६ | ७९ | ०·३५ |
| भूगर्भशास्त्र | — | ९ | २ | ३ | ३ | ३ | — | — | १ | २१ | ०·०९ |
| प्राणिशास्त्र | — | ९ | ७ | ४ | १० | ५ | ६ | १३ | ९ | ६३ | ०·२६ |
| वनस्पतिशास्त्र | — | ७ | ३ | २ | ६ | ४ | ११ | ४ | १० | ४७ | ०·२१ |
| उपयुक्त कला | — | १९ | २ | २ | ४ | १ | १ | १ | — | ३० | ०·१३ |
| वैद्यक | ५ | २१६ | ८४ | ११२ | १६५ | ११३ | ४ | ४८ | ४३ | ७९० | ३३·०० |
| कृषिशास्त्र | ५ | ३१ | १९ | २८ | ५२ | २४ | ११ | ९ | १७ | १९६ | ८·१५ |
| गृहशास्त्र | — | २० | १३ | १२ | १८ | १८ | १ | ५ | १३ | १०० | ४·१० |
| व्यापार | १ | २० | ९ | ८ | २९ | १३ | १ | — | १ | ८२ | ०·३५ |
| रासायनिक धंदे | — | २२ | १६ | ६ | २० | ७ | — | १ | — | ७२ | ०·३० |
| शिवणकाम | — | ३ | ४ | ४ | १७ | १७ | १३ | — | — | ५८ | ०·२४ |
| वास्तुविद्या | — | — | — | — | १ | १ | — | २ | — | ४ | ०·०२ |
| भौतिक यांत्रिक धंदे | — | ७ | ४ | ३ | ७ | ३ | ३ | — | — | २७ | ०·११ |
| एकूण | ३८ | ५०९ | १९२ | २१७ | ४२१ | ३४६ | १७५ | २२१ | २६० | २३७९ | |
| % | ०·१६ | २१·२ | ८·० | ९·० | १७·५ | १५·५ | ७·४ | ९·३ | ११·० | | |

करणाऱ्या अनेक नामांकित डॉक्टरांनी वैद्यक विषयावर अनेक ग्रंथ लिहिले. १८८० मध्ये मराठी माध्यमातून शिक्षण देणारा हा उपक्रम बंद पडला आणि त्याबरोबरच या प्रयत्नाचीही इतिश्री झाली. यापैकी वैद्यक, भूगोल, खगोल, ज्योतिष, अर्थशास्त्र इत्यादीपैकी प्रातिनिधिक प्रयत्नांचा स्थूल आढावा पूर्वीच्या लेखातून आला आहे. प्रस्तुत[1] लेखामध्ये त्यापुढील ५० वर्षाचा स्थूल आढावा घ्यावयाचा आहे. यावेळी प्रसिद्ध झालेल्या ग्रंथांच्या संख्येकडे पाहिले तर त्यात पहिला क्रमांक वैद्यक, दुसरा अंकगणित, तिसरा कृषिशास्त्र, चौथा पदार्थविज्ञान, पाचवा ज्योतिष व गृहशास्त्र याप्रमाणे व्यापार' रसायन इत्यादि विषयांच्या निर्मितीचे क्रमांक त्या खालोखाल आहेत.

१८७० नंतर शास्त्रीय विषयावर जी ग्रंथनिर्मिती झाली त्यात दाभोळकर ग्रंथमालेतर्फे झालेल्या प्रयत्नांचे स्वरूप लक्षणीय आहे आणि त्यातही बाळाजी प्रभाकर मोडक यांच्या प्रयत्नांचा निर्देश अवश्य व्हावयास पाहिजे. रा. दाभोळकर यांनी आपल्या पुस्तकमालेत १८९४ मध्ये 'शास्त्ररहस्य' व १९०९ मध्ये 'निबंध–रत्नमाला' अशी दोन निबंधात्मक पुस्तके प्रसिद्ध केली. दोन्ही ग्रंथात शास्त्रविषयक विवेचन आलेले आहे. शास्त्रीय विषय सुलभतेने समजावून देण्याचा प्रयत्न दोन्ही ग्रंथातील लेखात केला आहे.

१. गार्गी सरदेसाई 'अर्वाचीन मराठीतील प्रारंभीचे शास्त्रीय वाङमय' पूर्वार्ध–उत्तरार्ध नवभारत– जून १९६७, जुलै १९६७, वर्ष २० अंक ९, १०








## विविध ग्रंथमाला आणि शास्त्रीय वाङ्मय निर्मिती

१८८० ते १८९५ च्या कालखंडात निरनिराळ्या ग्रंथमालाद्वारा सरकारी शाळाखात्याने तज्ञांकडून शास्त्रीय विषयावरील अनेक पुस्तके भाषांतरित करवून घेतली.

शास्त्रग्रंथ मालेतर्फे फ्री जनरल असेंब्लीज इन्स्टीट्यूशन ' या संस्थेतील गणित व संस्कृत विषयांचे असिस्टंट प्रोफेसर नारायण व्यंकटेश खोत यांचे पदार्थविज्ञानाच्या शाखेतील ' पदार्थाची घटना ' हे पुस्तक १८७८ मध्ये प्रसिद्ध झाले.

प्रौढांना शास्त्रीय विषय सुलभतेने समजावून द्यावा याहृष्टीने प्रयत्न करणाऱ्या मालांमध्ये ' बालबोध शास्त्रपाठमाला ', ' अनेक विद्याविषयक बालविद्याग्रंथमाला ' या मालांच्या तर्फे अनेक विषयांवरील शास्त्रीय ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत.

बालबोध शास्त्रपाठमालेतर्फे १८८४ व १८८५ मध्ये अनुक्रमे ' पाणी व ' ' हवा ' ही बळवंतभाऊ नगरकर यांची पुस्तके प्रसिद्ध झाली. याच दोन विषयावर ' हवा ' १८९१–महादेव सिताराम गोळे व ' पाणी ' १८९२ श्रीनिवास भिकाजी सरदेसाई या लेखकानी लिहिलेली दोन पुस्तके आर्यभूषण छापखान्याने छापली आहेत. बळवंतभाऊ नगरकर यांनी ' विवेकवाणीमाला ' या नावाची एक माला चालविली होती, तिने १८८९ मध्ये शंकर रामचंद्र हातवळणे यानी लिहिलेले ' सृष्टपदार्थ नियम व सुधारणा ' हे पुस्तक प्रसिद्ध केले.

यापैकी अनेक ग्रंथांच्या प्रस्तावनातून ग्रंथ रचनेचे उद्देश नमूद केले आहेत त्यावरून त्या ग्रंथरचनेचा उगम कसा झाला हे सहज ध्यानात यावे. अनेक विद्याविषयक बालग्रंथमालेतर्फे विविध शास्त्रावरील अनेक ग्रंथ प्रसिद्ध झाले. ही माला १८७७–१८७८ साली सुरू झाली असावी. या मालेने का. बा. मराठे यांनी लिहिलेली पांच पुस्तके प्रसिद्ध केली. भूस्तरशास्त्रासंबंधी एक शालेय स्वरूपाचे पुस्तक १८७५ मध्ये याच लेखकाने प्रसिद्ध केले ते एका इंग्रजी पुस्तकाचे भाषांतर आहे. १८८३ मध्ये त्यांनी दगडी कोळशाच्या खाणीसंबंधी एक व्याख्यान दिले. प्रो. बा. प्र. मोडक यांनी आपल्या " पदार्थवर्णन " या पुस्तकाचा पहिला भाग १८९१ मध्ये प्रसिद्ध केला. या पुस्तकाची दुसरी आवृत्ती १९०५ मध्ये प्रसिद्ध झाली. का. बा. मराठे यांची वरील मालेतर्फे प्रसिद्ध झालेली पुस्तके १८७९ जीवनेंद्रियशास्त्र, १८८० सुवर्णशास्त्र, १८८० ज्योतिषशास्त्र, १८८२ न्यायशास्त्र, १८८६ भूशास्त्र, १८८७ वनस्पतिशास्त्र अशी होत. यांचेच रसायनशास्त्र १८८७ च्या सुमाराचे आहे. या काळात या विविध ज्ञानमालांनी शास्त्रीय विषयाची अभिरुची कायम ठेवण्याचे महत्त्वाचे कार्य केले आहे. इंग्रजीतील विज्ञानाचे विचार ज्या ग्रंथकारांनी, प्रौढ सुशिक्षितांनी आत्मसात केले होते त्यांना हे विचार आपल्या देशबांधवांना आत्मसात करता यावेत यासाठी मराठीमध्ये ते उतरविण्याची जरूरी भासू लागली. याच प्रेरणेने या विविध ज्ञानमाला प्रस्थापित झालेल्या दिसतात.

## शास्त्रीय वाङ्मयनिर्मात्यांचे अध्वर्यु– बाळाजी प्रभाकर मोडक:–

पदार्थविज्ञान आणि रसायन या दोन विषयावर फार मोठ्या प्रमाणात ग्रंथनिर्मिती करणारे या काळातील एक अधिकारी लेखक म्हणजे बाळाजी प्रभाकर मोडक हे होत. हे या काळातील शास्त्रीय वाङमय निर्मात्यांचे अध्वर्यु होत. डेक्कन कॉलेजात त्यांनी बी. ए. पर्यंतचा अभ्यास केला. आजारीपणामुळे पुढे पदवीचा नाद सोडून देऊन ज्यांनी कोल्हापूरच्या राजाराम हायस्कुलात शिक्षकाची नोकरी धरली. सांगली येथे असताना दादा छापखाने याजपाशी, बाळाजीपंताचा गणिताचा अभ्यास झाला. त्रिकोणमितीपर्यंत मजल मारता आली. परंतु[१] पुढें गणितविषय सोडून देऊन त्यांनी भौतिक शास्त्रांचा अभ्यास सुरू केला. त्यावेळी, डॉ. कुक नांवाच्या साहेबाकडे, इलाख्यातील मुख्य हायस्कुलातील काही शिक्षक सप्रयोग रसायनशास्त्र शिकण्यासाठी पाठ-

१. अर्वाचीन मराठी वाङमयसेवक– संपादक गं. दे. खानोलकर षष्ठ खंड, पृ. २८ ते ३८

विण्यात आले होते, त्यात बाळाजीपंत एक होते. पुणे येथे चार महिने राहून परत आल्यावर 'रसायन-शास्त्र' हा ग्रंथ त्यांनी १८७५ साली प्रसिद्ध केला. या ग्रंथाचे वैशिष्ट्य येथे ध्यानांत घ्यावयास पाहिजे. यापूर्वी हरि केशवजी, डॉ. नारायण दाजी आणि केरो लक्ष्मण छत्रे या तिघींनीही ग्रंथ लिहिले होते. यापैकी डॉ. नारायण दाजी यांच्या ग्रंथात विषयाचे विस्ताराने विवेचन केलेले आढळते. हरि केशवजीचा ग्रंथ तर शालोपयोगी स्वरूपाचाच होता. बा. प्र. मोडक यांचा हा ग्रंथ याविषयावरील पहिलाच स्वतंत्र ग्रंथ होय. आपल्या विषयाचा व्यासंग करून सतत दीर्घोद्योगाने त्यांनी अनेक शास्त्रीय विषयात प्राविण्य संपादन केले. पुढे काही काळ ते श्रीमंत मिरजकर, इचलकरंजीकर व विशाळगडकर यांचे ट्यूटर होते. १८७७ त त्यांना मिरजकरांचे शिक्षक नेमण्यात आले. पुढे १८७८ त त्यांना कोल्हापूरचे छत्रपति शिवाजी महाराज ह्यांच्या शिक्षकाची जागा मिळाली. १८८० साली ते पुन्हा मिरज-करांकडे गेले व पुढे १८८० मध्ये कोल्हापूर येथे राजाराम कॉलेज स्थापन झाले त्यात त्यांना सायन्सच्या लेक्चररची जागा मिळाली. १८९५-९६ मध्ये ते या संस्थेचे तात्पुरते प्रिन्सिपाल होते. १९०० साली त्यांनी निवृत्तिवेतन घेतले. निवृत्तीच्या काळात त्यांनी 'सेंद्रिय रसायनशास्त्र' व 'प्राणि-शास्त्र' हे दोन ग्रंथ लिहून प्रसिद्ध केले. १८८३ साली त्यांचा 'रसायनशास्त्राचा पूर्वार्ध' हा ग्रंथ प्रसिद्ध झाला. रसायनशास्त्रावरील त्यांची अनेक पुस्तके या विषयाची थोडी माहिती असणाऱ्याच्या पूर्ण अध्य-यनार्थ लिहिली असल्याचे ते सांगतात. रसायन-शास्त्रासंबंधी आणखी दोन पुस्तके १८८९ व १८९२ या दोन वर्षात प्रसिद्ध झाली. पैकी पहिले रसायन शास्त्राची मूलतत्त्वे ( Samuel Cook ) याच पुस्तकाच्या आधारे लिहिले गेले व ते मुंबईस सरकारी विद्याखात्याने प्रसिद्ध केले.

रसायनशास्त्राप्रमाणे पदार्थविज्ञानाविषयी देखील त्यांनी अनेक ग्रंथ लिहिले आहेत. पैकी १८८७ त पदार्थविज्ञान शास्त्रावरील मूलतत्वे, १८९१ साली प्रसिद्ध केलेला 'पदार्थवर्णन' भाग १ ला ( खनिज पदार्थ ) 'पदार्थवर्णन' भाग २ रा, १८९२. हे ग्रंथ श्री. मोडक यांच्या विज्ञानविषयक भरीव कामगिरीची साक्ष देणारे आहेत. याखेरीज 'सृष्टिशास्त्र किंवा पदार्थविज्ञानशास्त्र पूर्वार्ध' याची दुसरी आवृत्ती १८८१ मध्ये प्रसिद्ध झाली. या ग्रंथाचा उत्तरार्ध १८९३ मध्ये प्रसिद्ध झाला. 'सृष्टिशास्त्राची मूलतत्वे उत्तरार्ध– भाग पहिला ( घर्षणजन्यविद्युत् ) हे त्यांचे पुस्तक १८८० मध्ये लिहिले गेले. यांच्या अनेक ग्रंथांचे वैशिष्ट्य असे की त्यात त्याला विषयाचे सचित्र निरूपण केलेले असे. ग्यानोक्त पदार्थविज्ञान शास्त्राची मूलतत्वे हे त्यांचे पुस्तक १८९६ त बडोदे येथील श्री. सयाजीज्ञान मंजुषेतर्फे प्रसिद्ध झाले. १८९९ व १९०० मध्ये याच मालेतर्फे त्यांची 'उष्णता' पुस्तक ४ व ५ ही प्रसिद्ध झाली. या पुस्तकांच्या प्रस्तावनांतून त्यांनी मायभाषेतून शास्त्रीय विषय समजावून देणे आणि त्यात सुबोधता आणणे याविषयीची उदबोधक चर्चा केली आहे. यावरून मायभाषेतून शास्त्रीय विषय शिकविण्यासंबंधी त्यांच्या मनात सतत असणारी तळमळ सहज लक्षात येते.

पदार्थविज्ञान व रसायनाप्रमाणे आरोग्यशास्त्रातही श्री. मोडक यांनी अधिकारवाणीने लिहिले आहे. मुंबईस सरकारी विद्याखात्याने १८८८ प्रसिद्ध केलेले आरोग्यमार्ग व आरोग्य शास्त्रावरील त्यांची आणखी दोन १८९४ च्या दरम्यानची आहेत. आरोग्यशास्त्रावरील त्यांची पुस्तके उच्चवर्गातील मुलांच्या अभ्यासक्रमात नेमली गेली होती. वैयक्तिक जीवनातील आरोग्य व सार्वजनिक जीवनातील आरोग्य यासंबंधी विद्यार्थ्यांना योग्य ज्ञान असावे या उद्देशाने त्यांनी या विषयावरील लेखन केले.

यंत्रशास्त्र - पूर्वार्ध हे इंग्रजी मराठी परिभाषेसह प्रसिद्ध केलेले एक महत्वाचे पुस्तक होय. ते १८८७ मध्ये प्रथम प्रसिद्ध झाले.

अनेकविध शास्त्रीय विषयावर सतत व्यासंग करून मराठी भाषेत त्या विषयांत ग्रंथनिर्मिती करण्याचे कार्य १८७० ते १९२० या दरम्यान बा. प्र. मोडक यांच्याइतके मोठ्या प्रमाणात दुसऱ्या कोणाही ग्रंथकारांनी केल्याचे आढळत नाही. विषय-निरूपणाची त्यांची पद्धती अतिशय सुबोध आहे. कोणत्याही विषयाचे दीर्घ चिंतन, वाचन आणि










अध्यापन केल्याने त्या विषयाच्या निरूपणात जी सहजता येते ती श्री. मोडक यांच्या शास्त्रीय विषयावरील ग्रंथात सहज दिसून येते. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनी आपल्या निबंधमालेमध्ये 'रसायन-शास्त्र' या ग्रंथाचे परीक्षण करीत असतांना त्यांच्या व्यासंगाचा, शास्त्रीय विषयावरील अध्यापनात त्यांनी मिळविलेला 'अधिकाराचा' व त्यांच्या या विषयावरील ग्रंथलेखनासंबंधीच्या तळमळीचा गौरवपूर्वक उल्लेख केला आहे.

श्री. मोडक यांच्या 'रसायनशास्त्र' या ग्रंथाचे परीक्षण करीत असतां या ग्रंथात विज्ञानविषयक माहितीच्या निरूपणात जी सुलभता आली आहे तिचे शास्त्रीबुवांनी मोठ्या रसज्ञवृत्तीने पृथक्करण केले आहे. प्रत्यक्ष या विषयाचे दीर्घ कालपर्यंत अध्यापन करण्याची संधि प्राप्त झाल्यामुळे श्री. बाळाजी प्रभाकर मोडक यांना[१] 'नवीन शिकणारास हा विषय कसा सुबोध करून घ्यावा, त्यांस त्यातील कोणते भाग विशेष उपयुक्त आहेत हे सर्व अनुभवसिद्ध कळून प्रस्तुत ग्रंथ रचताना हा अनुभव त्यांस पुष्कळ उपयोगी पडला' भाषापद्धतीच्या दृष्टीने विचार केला तर 'कोणाही सामान्य वाचकास सहज अर्थग्रहण व्हावे अशा तऱ्हेची त्याची रचना केली आहे.' या ग्रंथात परिभाषा वापरीत असताना शास्त्रातील विशिष्ट संज्ञा ग्रंथकाराने मूळ इंग्रजी वापरल्या आहेत. काही ठिकाणी 'गुरु कार्ब्यूरेटेड हैड्रोजन' 'निर्जल नैत्रिक आसिड' अशा तऱ्हेच्या व्यभिचारी प्रयोगांचा वापरही झाला आहे. परंतु या संबंधी असे म्हणणे अवश्य आहे की, कोणत्याही विषयात - विशेषतः विज्ञानाच्या विविध शाखांमध्ये लेखन करणारास नव्यानेच पाउलवाट निर्माण करावयाची असल्याने हे सारे क्षम्य मानावे. जवळ जवळ दोनशेपेक्षा अधिक प्रयोग या ग्रंथात अंतर्भूत केले आहेत व ते आकृतिसह विशद केले आहेत. नव्या वाढणाऱ्या विज्ञानविषयक जिज्ञासेला मार्गदर्शक ठरणे हा त्यांच्या लेखनाचा एक हेतू असल्यामुळे त्यांनी प्रयोग त्यांची साधने त्याच्या किंमती या साऱ्याची माहिती आपल्या ग्रंथात दिली आहे. लोकामध्ये प्रयोगशील वृत्तीचे बीज रोवणे आणि ते सतत वाढीला लावणे हे लोकशिक्षणाचे महत्वाचे सूत्र त्यांनी ग्रंथलेखन करीत असतांना पूर्ण ध्यानात धरले आहे. विषय स्पष्ट करीत असता व्यावहारिक उदाहरणे दिल्यामुळे विज्ञानासारख्या सामान्य वाचकाना रूक्ष वाटणाऱ्या विषयामध्ये सुगमता निर्माण झाली. बदलत्या समाजरचनेचे इंग्रजी अमदानीत होणाऱ्या वैचारिक परिवर्तनाचे स्वरूप लक्षात घेऊन या गतिमानतेला निश्चित अशी प्रेरणा वैज्ञानिक विकासाने देता यावी म्हणूनच त्यांनी आपले समग्र ग्रंथलेखन केल्याचे दिसून येते.

कोल्हापूरच्या राजाराम कॉलेजमधून सेवानिवृत्त झाल्यावर १९०० ते १९०५ या दरम्यान 'सेंद्रिय रसायन शास्त्र' व प्राणिशास्त्र अशी दोन पुस्तके त्यानी प्रसिद्ध केली. लोकशिक्षणासंबंधी स्वयंस्फूर्त तळमळ हे त्याच्या मनोवृत्तीचे एक महत्वाचे वैशिष्टच होय. कोणत्याही शास्त्राचे विवेचन करीत असता प्रायोगिकतेवर भर देणे हे श्री. मोडक यांच्या वृत्तीचे एक महत्वाचे लक्षण मानले पाहिजे. याबाबतीत प्रत्यक्ष प्रमाण द्यावयाचेच झाले तर ते त्याच्या १८८१ साली रचलेल्या 'सृष्टिशास्त्र अथवा पदार्थविज्ञानशास्त्र पूर्वार्ध' या ग्रंथाच्या रचनेचे देता येईल. शिळाप्रेसवर छापलेली याची पहिली आवृत्ती १८७६ सालची आहे. या ग्रंथातील विषय शिकण्यास व प्रयोग करण्यास जी यंत्रे व पदार्थ लागतात त्यांची यादी इंग्रजीत शेवटी देऊन नावाचा अर्थ मराठीत दिला आहे. असे ग्रंथकाराने म्हटले आहे.[२] ग्रंथाच्या अखेरीस छापलेल्या निरनिराळ्या प्रयोग-साधनांच्या आकृती नमुनेदार आहेत. (परिभाषा स्वीकारण्याबाबत शक्य तेथे मूळ संज्ञा कायम ठेवाव्या अशी त्यांची वैचारिक भूमिका असे.) प्रस्तुत यंत्रसाधने देताना त्यांचे मूळ इंग्रजी नाव व स्पष्टीकरणात्मक रीतीने बनविलेली मराठीतील त्यासंबंधी परिभाषा अखेरीस दिली आहे. त्याकाळच्या प्रयत्नांचे स्वरूप लक्षात येण्याच्या दृष्टीने त्यापैकी

१. विष्णुशास्त्री चिपळूणकर, रसायनशास्त्र, **निबंधमाला** पृ. ४०२, आवृत्ति तिसरी १९२६ संपादक – वासुदेव विनायक साठे

२. बा. प्र. मोडक – प्रस्तावना सृष्टिशास्त्र किंवा पदार्थविज्ञानशास्त्र पूर्वार्ध आवृत्ती २ री १८८१










काही शब्दांचा येथे उल्लेख[२] करणे अप्रस्तुत ठरणार नाही.

| | |
|---|---|
| 1. Condensing syringe | १. वातपूरक यंत्र |
| 2. Inertia apparatus with a brass ball, by which a card can be struck from underneath the ball which falls into a cup. | २. पदार्थाचे जडत्व दाखविण्याचे यंत्र |
| 3. Hydrostatic bellows to illustrate that fluids press in all directions and The pressure is in proportion to the height of the vertical column of the fluid. | ३. जलमाता |
| 4. Hydrometer for fluids lighter than water. | ४. द्रवमापक |
| 5. A series of six glass tubes for showing capillary attraction. | ५. केशाकर्षण दाखविणाऱ्या नळ्या |
| 6. Sprit Level. | ६. पातळी वाहण्याचे यंत्र |
| 7. From empty Barometer tubes | ७. भार मापकाच्या नळ्या चार |
| 8. Tallow Holder. | ८. लुकण ठेवण्याची नळी |
| 9. Hard and bladder glass. | ९. हवेचा दाब दाखविण्याचे कांचेचे पंचपात्र |
| 10. Six Tin cylinders. | १०. हवेचा दाब दाखविण्याकरिता जस्ताची पंचपात्रे. |
| 11. Tall Fountain glass. | ११. कारंजा उडविण्याचें उंच भांडे |
| 12. Model for showing the principle of a common water pump. | १२. बंबाचा नमुना |
| 13. Two glass Syphons. | १३. दोन नलिका यंत्रे |
| 14. Appratus to show the theory of intermittent springs. | १४. कदाचित्क झऱ्याची रचना दाखविण्याचे यंत्र |
| 15. Tantalus cup. | १५. कृष्णाचा पेला |
| 16. Gas bag with stopcock and tobaccopipe. | १६. वायु सांठविण्याची रबरी पिशवी |
| 17. Maximum Thermometer. | १७. उच्च उष्णतामान मापण्याचे उष्णतामापक |
| 18. Minimum Thermometer | १८. नीच उष्णतामान मापण्याचे उष्णतामापक |
| 19. Dry and wet bulb Hygrometer. | १९. ओल्या व कोरड्या बोंडाचे द्रवमापक |
| 20. Lavoisiers Calorimeter. | २०. बर्फ वितळून विशिष्ट उष्णता काढण्याचे यंत्र |

२. Ibid pages 502–516








अशारीतीने परिभाषेचा वापर करताना अतिशय सुगम अशा शब्दांची योजना केली आहे. प्रस्तुत ग्रंथातील शास्त्रीय विषयाचे निरूपणही साधारण प्रौढास सहज आत्मसात करता येईल इतके सोपे आहे. त्या त्या विषयासंबंधीच्या ज्ञानात सखोलता आल्याचेच हे निदर्शक नव्हे काय ?

शास्त्रीय विषयांवर अनेक ग्रंथ लिहिणाऱ्या या एका अध्वर्यू लेखकाची त्यासंबंधीची भूमिका कोणती होती हे लक्षात यावे म्हणून त्यांचे प्रस्तावनेतील काही उद्‌गारही येथे उदधृत करणे वावगे ठरणार नाही. ते म्हणतात सर्व सृष्ट-शक्तीत सर्वव्यापक व प्रधान अशी शक्ति जी उष्णता तिजविषयी म्हणण्यासारखे मराठीत कोठेच लिहिलेले नाही. 'सृष्टिशास्त्राची मूलतत्त्वे' हे त्यांचे पुस्तक १८८० मध्ये लिहिले गेले. 'या पुस्तकात पाच सहा प्रकरणात जे उष्णताशास्त्रा-विषयी लिहिले आहे, तेणेकरून जर या प्रचंड शक्तीविषयी विचार करण्याची लोकांच्या[१] मनात उत्कंठा उत्पन्न होईल तर माझे लिहिण्याचे सार्थक झाले असे समजेन.'

१८७६–७७ मध्ये कोल्हापूर संस्थानातील संस्था-निक, मुधोळकर, मिरजकर, कागलकर, बावडेकर, प्रभृति सरदारांना पदार्थविज्ञानशास्त्रावर दिलेल्या व्याख्यानांच्या आधारे पदार्थविज्ञानशास्त्रावरील आपले १८७६ मध्ये शिळाप्रेसवर प्रथम प्रसिद्ध झालेले पुस्तक बाळाजी प्रभाकर मोडक यांनी तयार केले आहे. यापूर्वी हरि केशवजी यांनी physics या विज्ञानास सिद्धपदार्थ विज्ञान हा शब्द वापरला आहे. श्री. मोडक यांनी या शास्त्रास सृष्टिशास्त्र हा शब्द वापरला आहे. त्यांच्या मते 'सृष्टिशास्त्र' ही संज्ञा अधिक व्यापक आणि विशाल विषयांच्या सर्व शास्त्रांचा समावेश करणारी आहे. सृष्टिशास्त्राच्या अध्ययनाची गोडी लोकात अधिक पसरावी यासाठी साधारण वाचकांसही मनोहर व बोधपर व्हावे अशारीतीने त्यांनी आपल्या विषयाचे प्रतिपादन केले आहे. शिळाप्रेसवर छापलेली पहिली प्रत विद्याखात्याच्या सरकारी अधिकाऱ्यांकडे व 'मराठी ग्रंथोत्तेजक मंडळीकडे' पाठविण्यात आली. दोहोंनीही या प्रयत्नाचा गौरव केला परंतु काही कारणाने प्रकाशनार्थ लागणारे सक्रिय सहाय त्यांच्याकडून ग्रंथकाराला लाभले नाही, पुढे याच्या काही प्रती विद्याखात्याच्या मुख्याधिकाऱ्याने विकत घेतल्या. पुढे मूळ ग्रंथातील विषयाला अधिक पूर्णता यावी म्हणून त्यात भर घालण्यात आली, तो ग्रंथ प्रसिद्ध झाला. प्रस्तुत पुस्तकाची पहिली आवृत्ति प्रसिद्ध झाल्यानंतर दुसरी आवृत्ती निघण्याच्या दरम्यान भौतिक विज्ञानाकडे पाहण्याच्या एतद्देशीयांच्या दृष्टीमध्ये बराच बदल घडून आला. याच काळात विद्यापीठाच्या अभ्यासक्रमात भौतिक विज्ञानाचा प्रवेश झाला आणि त्याचे महत्त्व इतके वाढले की, या विष-यात पदवी देणारी शाखा सुरू झाली. त्यावेळच्या संस्थातून पदार्थविज्ञानशास्त्र शिकविण्याची सोय करण्यात आली. पुण्याच्या सिव्हिल इंजिनिअरिंग कॉलेजचे सायन्स कॉलेज म्हणून नामांतर झाले. कृषिशास्त्र शिकविण्याची सोय झाली. (जेथे भौतिक विज्ञान शिकविले जाई तेथे.) निरनिराळ्या शाखासंबंधी पुस्तके भाषांतरित व्हावी म्हणून शिक्षण खात्याने विद्वानांच्या नेमणुका केल्या. ही सारी परिस्थिती निर्माण होऊनही मराठीतून या विषयाच्या अध्यापनाला अद्याप वाव मिळाला नव्हता. त्यावेळचे विद्याखात्यातील मुख्याधिकारी मे. चाटफिल्ड यांनी कृषिकर्माचे वर्ग सुरू करण्यास बरेच उत्तेजन दिले. त्याप्रमाणे पदार्थविज्ञान रसा-यन, भूवर्णन, जीवनेंद्रियशास्त्र, इत्यादींवरील स्वतंत्ररीत्या तयार झालेल्या ग्रंथास उदार आश्रय देण्याचे कार्यही सरकारतर्फे चालू होते. परंतु तरीही या विषयावरील ग्रंथनिर्मितीला मिळावा तसा लोकाश्रय मिळाला नाही असा श्री. बाळाजी प्रभाकर मोडक यांचा अनुभव त्यांनी नमूद केला आहे.[२] मराठी पांचव्या सहाव्या इयत्तेतून व इंग्रजी पांचव्या सहाव्या इयत्तेत विज्ञान विषय

१. बा. प्र. मोडक- प्रस्तावना भाग २, सृष्टिशास्त्र किंवा पदार्थविज्ञानशास्त्र, पूर्वार्ध, आ. २, १८८१ (भाग २ मूळ प्रस्तावना १८७७ माहे १ जानेवारी– बा. प्र. मोडक)
२. तत्रैव – प्रस्तावना पृ. १०












शिकविला जावा अशी शिफारस मोडक यांनी केली आहे. श्री मोडक यांनी स्वतः जे शास्त्राध्ययन केले व विज्ञानाचा प्रसार सामान्य जनतेत व्हावा यासाठी जी ग्रंथनिर्मिती केली त्यात त्यांची स्वदेशोद्धाराची तीव्र तळमळ व्यक्त झाली आहे. आपल्या देशातील सोने, रुपे, लोखंड यासारख्या खनिज पदार्थातून धातुसंशोधन करण्याची योग्यता एतद्देशीयांत निर्माण व्हावी, व्यापार उद्योगधंदे इत्यादि भौतिक सुधारणेसही देशातील जनता कार्यक्षम झाली पाहिजे आणि त्यासाठी विज्ञानाचे मूलभूत अध्ययन अत्यंत आवश्यक आहे अशी विचारसरणी त्यांनी ठिकठिकाणी व्यक्त केली आहे. त्यासाठी प्रयोगशाळा स्थापन करणे जरूर आहे असे त्यांनी सुचविले आहे. ( Laboratory ) यास त्यांनी यंत्रशाळा अशी संज्ञा योजिलेली दिसते.

१८४८ ते १८५० या दरम्यान लोकहितवादींनी प्रभाकरातून जी शतपत्रे लिहिली त्यापैकी कित्येक पत्रात भारताच्या औद्योगिक विकासाचे स्वप्न त्यांनी सूचित केले आहे. हा औद्योगिक विकास होण्यास सामान्य जनतेची बौद्धिक श्रेणी उंचावली पाहिजे म्हणून शास्त्रीय ज्ञानाचे बाळकडू त्यांना मिळाले पाहिजे याची जाणीव १८७० नंतरच्या काळात सुशिक्षितांत निर्माण झाल्याचे लक्षण श्री. मोडक यांच्या ग्रंथनिर्मितीवरून दिसून येते. १९०४ साली मुंबई मराठी ग्रंथसंग्रहामध्ये दिलेल्या व्याख्यानात त्यांनी मराठी विद्यापीठाची योजनाही सरकारपुढे ठेवली होती. मराठीभाषेच्या अभिवृद्धीकरिता मराठी भाषेच्याद्वारे उच्च शिक्षण देणे जरूर आहे या मुद्याचे मंडन त्यांनी या व्याख्यानात केले आहे. कोणत्याही भाषेच्या सर्वांगीण विकासाचे मुख्य लक्षण म्हणजे तिच्यातील वाङ्मयाची विविध शाखातील समृद्धी होय. हे लक्षात घेऊन या व्याख्यानात बा. प्र. मोडक यांनी जे विचार प्रगट केले आहेत त्यांचा सारांश या ठिकाणी उद्धृत करणे अनवश्यक ठरणार नाही.

मराठी भाषेच्याद्वारे शिक्षण घेणाऱ्या ५,२५००० विद्यार्थ्यांपैकी फारच थोड्यांना उच्च शिक्षण घेण्याची संधि मिळाल्याचे त्यांनी नमूद केले आहे.[१] यत्तांच्या साच्यात सारा शिक्षणक्रम घालण्यापूर्वी अधिक शिक्षण मिळत असे. १८६० सालामध्ये मराठी शाळेत १९०४ सालापेक्षा अधिक प्रमाणात गणित, व्याकरण, भाषा, शिकविले जात. त्यावेळी केरूनाना, दाजीबा नगरकर, हरिपंत करंदीकर --- --- गंगाधरपंत टिळक, दादा छापखाने सांच्यासारखे नामांकित गणिती व कृष्णशास्त्री चिपळोणकर बाळशास्त्री जांभेकर, कृष्णशास्त्री गोडबोले, तळेकर लक्ष्मणशास्त्री हळवे ----- हरि केशवजी, दादोबा तर्खडकर ---- यासारखे भाषाकोविद निर्माण झाले होते. केवळ मराठी शिकलेल्या मास्तरवर्गात या तोडीचा एकही हल्ली आढळणार नाही. घनसमीकरण, गणित, त्रिकोणमिति, शंकुच्छेद, शून्य लब्धि, इत्यादि शब्द शेकडो मास्तरांच्या कानावरूनही गेलेले नसतात याचे कारण मराठीद्वारे शिक्षण अतिशय आकुंचित झाले हेच होते. १९०४ सालामध्ये मध्यंतरी शिक्षण मराठीद्वारा मिळेनासे झाल्यामुळे जी अनवस्था निर्माण झाली तिचे चित्र त्यांनी आपल्या व्याख्यानात उभे केले आहे.[२] जोपर्यंत विश्वविद्यालयात मराठी भाषा घेण्यास परवानगी असे तोपर्यंत हायस्कुलांतही मराठीचा अभ्यास बराच होई. १८६६ सालापर्यंत कॉलेजांतही तिचा अभ्यास चाले. १८६६ साली विद्यापीठामध्ये संस्कृतभाषा अवश्य केल्यापासून मराठीचे हायस्कुलांतून उच्चाटन झाले. याचा परिणाम असा झाला की संस्कृत भाषा नवीनच सुरू झाल्यामुळे त्याचेही ज्ञान थोडे व मराठीचे मुळीच नाही. यानंतरच्या १० वर्षांच्या अवधीत म्हणजे १८७५–७६ च्या अवधीत जे पदवीधर झाले त्यास मराठीत चांगले लिहिता येत नव्हते व शब्द माहित नसत.

---

१. श्री. बा. प्र. मोडक यांचे व्याख्यान ' मराठी भाषेच्या अभिवृद्धीकरिता मराठी भाषेच्या द्वारे उच्च शिक्षण देण्याची आवश्यकता ' पृ. ४,१९०४

२. तत्रैव– पृ. ६







## अर्वाचीन मराठीतील शास्त्रीय वाङ्मय

मराठी[१] किंवा गुजराथीत सर्व विषयावर पुरेसे ग्रंथ नाहीत या सबबीवर तिचे विद्यापीठाच्या अभ्यासक्रमातून उच्चाटन करणे त्यांना अव्यवहार्य वाटले, परंतु ही परिस्थिती पत्करणे देशहिताचे नाही हा मुद्दा त्यांनी आपल्या निरूपणात स्पष्टपणे मांडला आहे. खपाशिवाय ग्रंथ तयार होणार नाहीत परंतु उच्च शिक्षण ज्या भाषेतून मिळत असेल त्या भाषेत उच्च शिक्षण देणाऱ्या संस्थात शिकविण्यासाठी ग्रंथ तयार होतात. उच्च शिक्षण व ग्रंथ बरोबरच वाढणारे आहेत.[२] एकाशिवाय दुसऱ्याचे अस्तित्व अशक्य आहे, खप होऊ लागला की भराभर ग्रंथ होतील. कधी वाण पडणार नाही. त्यास त्यांनी दिलेली काही उदाहरणे विद्यापीठातून मराठी माध्यमाचे उच्चाटन झाल्यावर ग्रंथनिर्मिती का घटली याचे पुरेसे स्पष्टीकरण करणारी आहेत... वकील मुनसफीच्या परीक्षा मराठीत होत होत्या. तेव्हा हायकोर्टाने कोणतीही बुके नेमली तरी ती लागलीच मराठीत तयार होत. श्री. आपटे यांनी अपकृत्य शास्त्र हे बुक नेमल्यापासून पाच सहा महिन्यात उमेदवाराच्या हाती दिले.[३] उच्च शिक्षण सुरू केल्याबरोबर खूप उत्पन्न होईल व बुके उत्पन्न होतील. मात्र पुस्तके झाल्यावर मराठीच्या द्वारे उच्च शिक्षण द्यावयाचे म्हटल्यास आणखी तीन चार शतके सुद्धा तशी स्थिती येईल की नाही याची वानवाच आहे. श्री. मोडक यांनी १९०४ साली उच्च शिक्षणातील मराठी माध्यम आणि विविध विषयातील समृद्ध ग्रंथनिर्मिती यासंबंधी व्यक्त केलेले विचार आजही मार्गदर्शक ठरणारे आहेत. या दोन विषयाचा संबंध परस्पर सापेक्ष आहे हे त्यांनी तेव्हाही सिद्ध केले आहे. स्वदेशी चळवळीत स्वदेशी भाषांस प्रमुख स्थळ मिळाले पाहिजे. स्वदेशी भाषांत ग्रंथरचना, स्वदेशी भाषांच्या द्वारे सर्व शिक्षण देणे व स्वदेशी भाषा सुधारणे ह्या गोष्टी आवश्यक आहेत, असे त्यांनी प्रतिपादन केले आहे. विशेषतः शास्त्रीय विषयाचे–रसायनशास्त्र, सृष्टिशास्त्र व खनिजशास्त्र प्रथम अध्ययन व्हावे; विवक्षित शास्त्रापासून निघालेल्या यंत्राविषयी व प्रचलित यंत्राविषयी पूर्ण माहिती देण्याची तजवीज असावी, स्वदेशी जिन्नस वापरावयाचा निश्चय अमलात येण्यासाठी स्वदेशी जिन्नस उत्पन्न करण्याचे कारखाने निघाले पाहिजेत. सुधारलेल्या रीतीने लोखंड, तांबे, पितळ इत्यादींच्या खाणी आपल्या येथे असूनही सुधारलेल्या रीतीने धातु गाळण्याची प्रक्रिया पुरेशा शास्त्रीय ज्ञानाच्या अभावी आम्हाला अवगत नव्हती. सामान्य लोकसमूहाची बौद्धिक उन्नती सकस रीतीने होण्यासाठी त्यांच्याकडून शास्त्राचे अध्ययन होणे अवश्य आहे याची जाणीव एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात श्री. मोडक यांच्या लेखनातून व्यक्त झाली आहे. त्यांचे मुख्य वैशिष्टच असे की या वैचारिक भूमिकेच्या अनुरोधाने विज्ञानविषयक ग्रंथलेखनाचे भरीव कार्य त्यांनी आयुष्यभर सतत व्यासंगपूर्वक केले आहे.

शास्त्रीय वाङ्मयनिर्मिती करीत असताना ठरलेले निश्चित उद्दिष्ट, तदनुसार सातत्याने परिश्रमपूर्वक केलेला व्यासंग आणि त्या दिशेने विविध वैज्ञानिक विषयावर केलेली ग्रंथनिर्मिती, त्यातून सर्वत्र आलेले विषयाचे सुबोध प्रवाही निरूपण, आपल्या भरीव ग्रंथनिर्मितीतून त्यास लिहिलेल्या प्रेरक प्रस्तावनातून त्यांनी पुढील पिढ्यांना केलेले मार्गदर्शन हे सारे लक्षात घेतले म्हणजे एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धातील मराठी वैज्ञानिक वाङ्मयाचे खरे अध्वर्यु बाळाजी प्रभाकर मोडक हेच होत असे म्हणावे लागते.

१८८० नंतरच्या कालखंडात शास्त्रीय विषयावर ग्रंथ प्रकाशित करणाऱ्या विविध मालांपैकी अनेकांनी रसायनशास्त्र, पदार्थविज्ञान, भूवर्णन, वनस्पतिशास्त्र आरोग्यशास्त्र इत्यादी अनेक शास्त्रासंबंधीची पुस्तके प्रकाशित केली. परंतु याच काळात ज्ञानप्रसाराच्या दृष्टीने केलेले काही वैयक्तिक स्वरूपाचे प्रयत्नही उल्लेखनीय ठरतात. यामध्ये डॉ. भालचंद्र कृष्ण भाटवडेकर यांनी केलेले ग्रंथलेखनाचे काही प्रयत्न

१. तत्रैव पृ. ८
२. तत्रैव– पृ. ९
३. तत्रैव– पृ. १०








उल्लेखनीय होत. 'वनस्पतिशास्त्राची मूलतत्वे' हे त्यांचे पुस्तक १८८१ मध्ये प्रसिद्ध झाले. त्यावेळी मराठी भाषेत या विषयावर एक लहानसे पुस्तक बाहेर पडले होते. पुढे जे एक पुस्तक निघाले त्यायोगेही विषयाची पूर्तता होणे शक्य झाले नाही. यावेळी या ग्रंथकर्त्याने केलेल्या निवेदनातून तत्कालीन परिस्थितीचे स्वरूप स्पष्टपणे लक्षात येते. १९९१ पूर्वी उन्नतीसाठी झटणाऱ्या साऱ्या विचारवंतांच्या लक्षात हे आले होते की, शास्त्रीय ज्ञानाचा प्रसार झाल्यावाचून लोकोद्धार होणे अशक्य आहे. याच भूमिकेचा आविष्कार प्रस्तुत पुस्तकाच्या प्रास्ताविका-मध्ये आला आहे. ललित वाङ्मयालाही जेथे आमच्या देशात पुरेसे वाचक लाभत नव्हते तेथे शास्त्रीय वाङ्मयाचा वाचकवर्ग बहुसंख्येने निर्माण व्हावा ही गोष्ट तर अशक्यप्रायच होती. खेरीज या विषयाचे ज्ञान इंग्रजीतून दिले जाई. त्याचा व्यवहारही इंग्रजी-तून होई, अशा अवस्थेत मध्यमवर्गात या विषयाचे ज्ञान वाढावे या हेतूने देशीभाषेतून ज्ञानप्रसार होणे इष्ट आहे ही भूमिका पत्करून प्रस्तुत प्रयत्न केला आहे, असे ग्रंथकर्त्याने नमूद केले आहे. मध्यम-स्थितीच्या बहुतेक लोकात आणि मुख्यत्वे हलक्या वर्गाच्या लोकांत इंग्लिश भाषेची व्याप्ती अद्यापी झाली नाही, आणि पुष्कळ लोक असे आहेत की, त्याना इंग्लिश भाषा मुळीच समजत नाही. असल्या लोकास शास्त्रीय विषयाचे ज्ञान स्वभाषेच्याद्वारे दिले पाहिजे. वस्तुतः कोणतेही शास्त्रीय ज्ञान कोण-त्याही देशात किंवा लोकात त्या देशाच्या किंवा लोकांच्या स्वभाषांद्वारे दिले नसले तर ते तेथे विस्तार पावणार नाही किंवा लोकग्राह्य होणार नाही, असे पुष्कळ मान्य लोकांचे मत आहे. परंतु विविधशास्त्रीय विषयामध्ये परिभाषेची उणीव हा जो एक यक्षप्रश्न दीर्घकालापासून आजतागायत मराठीतून वैज्ञानिक विषयांवर लेखन करणाऱ्या लेखकांना जाणवत आहे तो डॉ. भालचंद्रांनाही जाणवला, ते प्रस्तुत पुस्तकाच्या प्रस्तावनेत म्हण-तात : "देशीय भाषेत कोणताही शास्त्रीय ग्रंथ लिहिताना किंवा त्याचे भाषांतर करताना पहिली मोठी अडचण ही पडते की, योग्य शब्द मराठी भाषेत मिळत नाहीत, इंग्रजीतून मराठी व मराठी-तून इंग्रजीत असे शास्त्रीय शब्दांचे कोष नसल्या-मुळे ही अडचण बहुत पडते. ( तेव्हा मराठीमध्ये कोणताही शास्त्रीय पारिभाषिक कोष उपलब्ध नव्हता ) त्यांचे ऐवजी मराठी किंवा संस्कृत घालण्याविषयी यत्न केला आहे. जेथे म्हणून इंग्लिश शब्दांचे मराठी भाषांतर करणे कठीण पडले तेथे तेथे इंग्लिश शब्द तसेच ठेवले आहेत. कारण त्याचे मराठी भाषांतर करून वाचकांस जितका बोध होणार तितकाच मूळचे शब्द ठेवल्याने होईल. ज्या शब्दांचे मराठी किंवा संस्कृत उपशब्द मिळाले आहेत त्यांचा उपयोग ह्या पुस्तकात केला आहे." पारिभाषिक शब्द तयार करताना व्यवहाराकडे पाहून कोणते धोरण स्वीकारावे लागते अगर लागेल याची कल्पना भालचंद्रांनी प्रदर्शित केलेल्या विचाराने होण्यास हरकत नाही. परिभाषा मूळ परदेशीय शब्दापेक्षा अधिक दुर्बोध होता कामा नये. शास्त्रीय परिभाषेच्या संबंधात राष्ट्रीयत्वाच्या खोटया अभिमानास बळी पडल्याने शास्त्रवाङ्मयाची प्रगती होणे कठीण आहे. प्रगति-शील राष्ट्रामध्ये शास्त्रीय परिभाषेसंबंधी अधिक उदार धोरणाचा अवलंब केल्याचे दिसून येते. ज्ञानाला राष्ट्रीयत्वाच्या सीमेत जखडण्याचा प्रयत्न करणे अंतिम राष्ट्रहिताचे ठरणार नाही. हीच दृष्टी डॉ. भालचंद्रांनी पुरस्कारली होती. मराठी भाषेच्या द्वारे शास्त्रीय ज्ञानाचे अध्ययन व अध्यापन चालू नसल्याने शास्त्रीय विषयावरील इतर ग्रंथांची जी उपेक्षा झाली तीच या पुस्तकालाही पत्करावी लागली. मुद्दाम देशी भाषेतून शास्त्रे शिकविण्या-करिता काढलेल्या बडोद्याच्या विद्यालयाला देखील थोडयाच काळात राम म्हणावे लागले. देशी भाषा-तून शिक्षणक्रम बंद झाल्याने अनेक ग्रंथांची या-प्रमाणे उपेक्षा झाली. १८८४ मध्ये याच ग्रंथकाराने 'अबला संजीवन' अथवा 'आपल्या देशातील स्त्रियांच्या अकालिक मृत्यूची कारणे व ती निवार-णार्थ उपाय' हे पुस्तक बडोद्यास असताना लिहिले. आपल्या देशातील स्त्रियांचा अकालिक मृत्यू हा दीर्घ कालापासून चर्चेचा विषय बनला आहे. डॉ. भाल-चंद्रांसारख्या निष्णात डॉक्टरलाही या प्रश्नाचे चिंतन करणे समाजहिताच्या दृष्टीने अवश्य वाटल्यास








नवल नाही. १८७७–७८ मध्ये स्नेह्यांच्या सूचनेनुसार त्यांनी प्रथम या विषयावर इंग्रजीत पुस्तक लिहिण्यास प्रारंभ केला. काही भाग लिहून झाल्यावर असे लक्षात आले की, "इंग्रजी भाषा परकीय व ती आपल्या लोकांपैकी फारच थोडच्या लोकांना येते व मुख्यत्वेकरून ज्यांच्या उपयोगाकरिता ग्रंथ लिहावयाचा अशा आपल्या स्त्रीजनांपैकी, बहुतेकास तर तिचा गंधही नसल्यामुळे इंग्रजी भाषेत पुस्तक लिहिण्यापासून काही फायदा होणार नाही." स्त्रियांच्या अकालिक मृत्यूची संख्या कमी व्हावी हा या लेखनामागील मुख्य हेतु होता. वैद्यक शास्त्राच्या दृष्टीने आवश्यक व इष्ट ठरणारे काही निर्बंध समाजात रूढ झाले पाहिजेत, अशी त्यांची भूमिका या पुस्तकात व्यक्त झाली आहे. याविषयावर त्या काळी अद्याप एकही ग्रंथ झालेला नव्हता. विवाह–संस्कारावद्दल समाजसुधारणेच्या अनुरोधाने या पुस्तकानंतर अनेक ग्रंथ झाले. परंतु त्यात केवळ इतिहास, धर्मशास्त्र व तत्त्वज्ञान यांचा विचार आला. स्त्रीजीवनातील नैसर्गिक व अपरिहार्य शारीरिक व्यापारांचे ज्यात शुद्ध वैद्यकशास्त्रानुसार निरीक्षण होते असे हे पुस्तक होते. यापूर्वी १८७९ साली त्यांनी डॉ. पार्क यांच्या ग्रंथाच्या आधारे 'सार्वजनिक आरोग्य किंवा सामाजिक आरोग्य रक्षणाची मूलतत्त्वें' या नावाचे पुस्तक लिहिले. 'कोणत्याही पुस्तकाचे शब्दशः भाषांतर हिंदुस्थानात उपयोगी पडणार नाही, हे जाणून, हा विषय हिंदुस्थानच्या स्थितीस लागू पडेल अशा पद्धतीने लिहिला आहे. जरी या पुस्तकातील विचार वस्तुतः पाश्चात्य आहेत– कारण आरोग्यरक्षणाची योग्यता प्रथम पश्चिमेकडे वळून आली व तिकडेसच त्यांची विशेष चर्चा झाली- तरी ते आपल्यास जरूर आहेत तितकेच घेऊन सोयीस पडतील अशाच तऱ्हेने व्यक्त केले आहेत. आरोग्यासंबंधीच्या आपल्या एकंदर विवेचनास शास्त्रशुद्धता यावी म्हणून त्यावेळी हिंदुस्थान सरकारने किंवा प्रांतिक सरकारने केलेल्या याविषयींच्या कायद्याची माहिती त्यांनी आपल्या मजकुरात गोविली आहे. या निरनिराळ्या ग्रंथांचा विचार करता असे म्हणावे लागते की १८७० नंतरही एतद्देशीय सुशिक्षितांनीं मराठी भाषेतून शास्त्रीय विषयावर ग्रंथरचना करण्याकडे संपूर्ण दुर्लक्ष केलेले नाही. मात्र त्यावरून एकंदर समाजात वैज्ञानिक दृष्टिकोण फार मोठ्या प्रमाणात रुजला होता असे अनुमान करणे चुकीचे ठरेल. सामान्य समाजाला अधिक सुबुद्ध करण्याच्या दृष्टीने शास्त्रीय विषयावर मराठीत लेखन करणाऱ्या लेखकांना परिभाषेची अडचण ह्यापासून परावृत्त करू शकली नाही. आपल्या प्रतिपाद्य विषयाचा दीर्घ व्यासंग, सखोल अनुभव आणि लोकहिताची तळमळ या तीन वृत्तिवैशिष्टचामुळे जे थोडे लेखन विविध लेखकांच्या हातून झाले तेही भरीव स्वरूपाचे होते. वनस्पतिशास्त्रावर यानंतरही काही उल्लेखनीय ग्रंथ झाले आहेत. परंतु त्यापैकी बहुतेकांचे लेखन १९३० नंतरच्या काळात झाले आहे. डॉ. सांबारे यांनी हेमंतव्याख्यानमालेमध्ये दिलेले व्याख्यान 'वनस्पतीचा संसार' या नावाखाली पुस्तकरूपाने १९०१ साली प्रसिद्ध झाले. हे पुस्तक अतिशय मनोरंजक रीतीने लिहिलेले आहे. शास्त्रीय वाङ्मयाची गोडी वाटावी म्हणून अशा प्रकारचे ग्रंथलेखन सतत होत राहणे जरूर आहे.

कै. डॉ. कीर्तिकर[१] शंकरशास्त्री पदे व प्रो. आबासाहेब भाटे यांनी देखील वनस्पतिशास्त्र विषयक लेखन केले आहे. आणि या ग्रंथकारांनी केलेले हे प्रयत्न लक्षणीय आहेत. आपल्याकडील एकंदर शास्त्रीय वाङ्मयावरील ग्रंथलेखन विचारात घेता, असे दिसून येते की जडशास्त्रापेक्षा तात्विक ग्रंथाची अधिक प्रमाणात निर्मिती होत असते. १८५७ त उद्भिज्जशास्त्र नावाचे एक पुस्तक प्रथम प्रसिद्ध झाले. यानंतर १६ वर्षांनी म्हणजे १८७३–७४ मध्ये 'वृक्षविनोद' नावाचा ग्रंथ तयार झाला. ट्रेनिंग कॉले-

---

१. प्रो. रघुनाथ विष्णु दामले, "वनस्पतीशास्त्राचा स्थूल इतिहास" **विविधज्ञानविस्तार** (विविध ज्ञानविस्ताराच्या पन्नाशीच्या आनंदोत्सवाचे स्मारक) १९२३ जुलै, ग्रंथ पहिला; उत्तरार्ध निबंधावली पृ. ४९

जच्या विद्यार्थ्यांच्या तसेच पूर्वी मेडिकल कॉलेजात मराठीत शिक्षणाचा एक वर्ग असे त्यावेळच्या विद्यार्थ्यांच्या उपयोगाकरिता 'वनस्पति म्हणजे काय' वनस्पतिशास्त्राची मूलतत्त्वे,' (याचा निर्देश वर आला आहे) व 'वनस्पति प्रायमर' अशी तीन पुस्तके अस्तित्वात आली पुढे मेडिकल कॉलेजात मराठी शिक्षण देण्याचा उपक्रम बंद झाल्यावर सरकारी ट्रेनिंग कॉलेजच्या विद्यार्थ्यांच्या सोईसाठी सुद्धा निराळे एखादे पाठ्य पुस्तक तयार करविले गेले नाही डॉ. सांबारे यांचे हेमंत व्याख्यानमालेत दिलेले 'वनस्पतीचा संसार' या विषयावरील उपरिनिर्दिष्ट व्याख्यान खेरीज उद्भिजसृष्टीतील चमत्कार, 'वनस्पति वर्णन' व 'वनस्पति-विचार' ही पुस्तके ग्रंथसंपादक व ग्रंथप्रसारक मंडळीकडून प्रसिद्ध झाली. वनस्पति वर्णनात, वनस्पतींचे औषधीय विवेचन केले आहे. 'वनस्पतिविचारात, वनस्पतिशास्त्राचा थोडा बहुत शास्त्रीय पद्धतीने विचार केला आहे. मात्र त्यात वनस्पतींची चित्रे नसल्याने विषय सुगम होणे कठीण झाले आहे. नागपूरच्या ज्ञानकोषमंडळाने जी महाराष्ट्रीय वाङमयसूची प्रसिद्ध केली आहे त्यात आणखी 'अंबा' व 'कविताबद्ध व्यवस्थेशीर वनपति-शास्त्र' या दोन पुस्तकांची नांवे आढळतात. दाभोळकर ग्रंथमालेने या कालखंडांतील शास्त्रीय वाङमयाच्या प्रकाशनास मोठा हातभार लावल्याचे नमूद केले आहे. या ग्रंथमालेने वनस्पतिशास्त्र-विषयक आणखी काही पुस्तके प्रसिद्ध केली आहेत. 'जीवशास्त्राची मूलतत्त्वे' व 'जननमरणमीमांसा' ही दोन पुस्तके प्रस्तुत ग्रंथमालेने प्रकाशित केली आहेत. पैकी जीवशास्त्राची मूलतत्त्वे ह्या पुस्तकात वनस्पति व प्राणी या दोहोंच्या जीवनकार्याचे विवेचन आले आहे. ग्रंथकाराचा विषय-प्रतिपादनात हातखंडा असल्याचे दिसून येते. यातही चित्रे नाहीत. ग्रंथकाराची भाषा भारदस्त आहे. 'जननमरण-मीमांसा' (१९०७) या पुस्तकात तार्किक विचारांचा पगडा अधिक आहे. वनस्पतिगुणादर्शात वनस्पतींच्या औषधीय गुणांचे विवेचन आले आहे. याखेरीज वर्तमानपत्रात अथवा मासिक पुस्तकामध्ये या विषयावर लिहिलेल्या काही लेखमाला आहेत.

यातील वहुतेक लेख सामान्य शरीरवर्णनात्मक आहेत. डॉ. का. र. कीर्तिकर यांच्या विविधज्ञान-विस्तार पृ. २७ अंक ३० यात प्रसिद्ध झालेल्या 'उद्भिज्ज चमत्कार' ह्या लेखाचा निर्देश या काळातील शास्त्रीय वाङमयनिर्मितीत होणे अवश्य आहे. कोणत्याही शास्त्रावर अधिकात अधिक ग्रंथनिर्मिती होत राहणे हे बरेचसे त्या विषयासंबंधीच्या वाढत्या लोकाभिरुचीवर अवलंबून राहते. ही अभिरुची परिणत होण्यास आधी त्या विषयाची गोडी शिक्षण-क्रमातून लागावयास हवी. त्यासाठी सारे शिक्षण मातृभाषेतून मिळणे ही पहिली महत्वाची घटना होय, यात शंका नाही.

प्राणिशास्त्रावरील पुस्तकातही या कालखंडात काही भर पडल्याचे दिसून येते. प्राणिशास्त्र ही जीवनशास्त्राची एक शाखा होय. मराठीमध्ये त्या काळात प्राणिशास्त्रावर एकही स्वतंत्र असा ग्रंथ प्रसिद्ध झाला नाही. त्यांतल्या त्यांत वि. गो. विजापूरकर यांनी लिहिलेले 'हिंदुस्थानातील सर्प' हे एक उल्लेखनीय पुस्तक ठरते. यामध्ये सर्पांच्या जाती, सर्पदंशावरील उपाय इत्यादींचे वर्णन आले आहे. त्यांनी वापरलेले पारिभाषिक शब्द पुष्कळ उपयोगी व सुलभ असून त्यातील बरेचसे कायम ठेवता येण्याजोगे आहेत. ही एकंदर माहिती फार जुन्या काळातील असल्याने चालू काळात ती फारशी उपयुक्त ठरणारी नाही.

दाभोळकर ग्रंथमालेने १८९५ ते १९२० या दरम्यान शास्त्रीय वाङमय प्रकाशनाची जी भरीव कामगिरी केली त्यात आणखी काही ग्रंथांचा उल्लेख जरूर व्हावयास पाहिजे. १८९७ मध्ये चिं. वा. भाटचे यांचे 'जीवनशास्त्रांची तत्वे' व १९०७ मध्ये त्यांचे 'जननमरणमीमांसा' ही दोन्ही पुस्तके या ग्रंथमालेनेच प्रसिद्ध केली.

या कालखंडात गणितशास्त्रावर झालेली पुस्तके अगदी तुरळक व प्राथमिक स्वरूपाची आहेत. विद्यापीठातील गणित हा विषय इंग्रजीतून शिकविला जाई. स्वाभाविकच गणितावर १८७० पूर्वी झालेल्या ग्रंथांच्या मानाने या काळात ती सरासरी घटली. एका इंग्रजी पुस्तकावरून भाषांतरित केलेले श्री. कुलकर्णी यांचे 'शंकुच्छेद' हे एक पुस्तक उपलब्ध











आहे. या व्यतिरिक्त विनायकशास्त्री खानापूरकर यांनी 'लीलावतीचे भाषांतर' (१८९७) व 'भास्कराचार्यांचे ज्योतिर्गणित' अशी दोन पुस्तके प्रसिद्ध केली आहेत.

ज्योतिषशास्त्रावरील या काळात झालेले अनेक ग्रंथ अंतरिक्षाविषयी वाढणाऱ्या कुतूहलाचे निदर्शक आहेत. यातील काही ग्रंथ तौलनिक व प्राचीन इतिहासाचा मागोवा घेणारे असे आहेत. यातील विषयनिरूपण सखोल व चिकित्सक वृत्तीचे आहे. यापैकी शं. बा. दीक्षित यांचे 'ज्योतिर्विलास अथवा 'रात्रीची दोन घटका मौज' हे पुस्तक अत्यंत मनोरंजक व सुबोध भाषेत लिहिलेले आहे. १८९२ साली ते प्रथम प्रसिद्ध झाले. त्यानंतरही त्याच्या पाच आवृत्त्या निघाल्या. इतक्या आवृत्त्या निघण्याचे भाग्य दुसऱ्या कोणत्याही पुस्तकाला पूर्वी लाभलेले नाही. सामान्य वाचकांसाठी लिहिलेले श्री. पेठे यांचे 'विश्वचमत्कार १८९४ मध्ये आणि श्री. चिटणीस यांचे 'अंतरिक्षातील चमत्कार' १८९६ मध्ये प्रसिद्ध झाले.

मराठी साहित्य संमेलनाच्या १९ व्या अधिवेशनाच्या शास्त्रीय विभागाचे अध्यक्ष प्रो. परांजपे यांनी आपल्या अध्यक्षीय भाषणात याविषयी म्हटले आहे की, "'ज्योतिर्विलास' या नावाच्या विश्ववर्णनात्मक शास्त्रीय ग्रंथाच्या तोडीचे दुसरे पुस्तक अद्यापि निर्माण झालेले नाही, असे म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाही." १८९६ मध्ये श्री. चिटणीस यांनी सामान्य वाचकांकरिता लिहिलेले याच विषयावरील पुस्तक म्हणजे 'अंतरिक्षातील चमत्कार' हे होय. १८९१ मध्ये खगोलशास्त्राचा अभ्यास करण्याच्या दृष्टीने रा. केळकर यांनी 'आकाशातील देखावे' हे पुस्तक लिहिले. यात आकाशाचे वेगवेगळे नकाशे दिलेले आहेत व त्यासंबंधी विस्तारपूर्वक माहितीही दिली आहे. शं. बा. दीक्षित यांच्या ज्योतिर्विलास या पुस्तकात ज्योतिःशास्त्राचा उगम मनुष्याच्या जिज्ञासावृत्तीत आहे असे नमूद करून नंतर आपल्या लेखनाचा उद्देश स्पष्ट करण्याविषयी लेखकाने काही निवेदन केले आहे. ते म्हणतात, "कोणत्याही शास्त्राचा इतिहास जाणण्याविषयी प्रवृत्ति कमी, आणि लौकिक पुरुषांचे वर्णन करण्याचा प्रकार फार थोडा, यामुळे अशाप्रकारचा ग्रंथ आजपर्यंत झाला नाही. इ. स. १८८४ च्या सुमारास पंचांगाच्या अनास्थेविषयीच्या चळवळीत पंचांगाच्या अनास्थेचा विचार ज्योतिःशास्त्राच्या इतिहासासह व्हावा अशा हेतूने पुण्याला दक्षिणा प्राइझ कमिटीने एक जाहिरात काढली असे सांगून ग्रंथकार पुढे म्हणतात 'माझ्या आवडीचाच विषय पुढे आल्यामुळे ग्रंथ लिहिण्याविषयी अधिकच मनांत आले. या शब्दात ग्रंथलेखनाचा हेतू स्पष्ट झाला आहे. त्या काळामध्ये सामान्य वाचकांच्या ठिकाणी याविषयी किती अनभिरुचि होती याचा स्पष्ट पुरावा ग्रंथकाराने पुढे दिलेल्या उद्गारात सांपडतो 'या व्यासंगापासून होणारा आनंद याशिवाय या कामाचा दुसरा मोबदला नाही.' हे ते उद्गार होत. या सदरात पडणारे दुसरे पुस्तक म्हणजे श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांचे 'भारतीय ज्योतिर्गणित' हे पुस्तक संशोधनात्मक दृष्टीने लिहिलेले आहे ते १९१३ साली प्रसिद्ध झाले. तत्कालीन ग्रंथकारामध्ये विज्ञानासंबंधी स्वतंत्र रीतीने वृद्धिंगत होणाऱ्या चिकित्सेचे हे एक उत्कृष्ट उदाहरण होय. 'भारतीय ज्योतिर्गणिता'च्या प्रस्तावनेत शास्त्राध्ययनाचे काही फायदे सांगितले आहेत. रसायनशास्त्राचे योगाने किमयेचा अस्थानी होणारा व्यय कमी होतो, ज्योतिःशास्त्रामुळे ग्रहणविषयक व इतर भ्रामक समजुतींचे निरसन होते, विचारांचा ओघ योग्य दिशेकडे वळतो, अशी यासंबंधी त्यांची भूमिका आहे. या ग्रंथास मुख्यतः शं. बा. दीक्षित यांच्या 'भारतीय ज्योतिषशास्त्र' या १८९६ साली प्रसिद्ध झालेल्या ग्रंथाचा आधार आहे. हा ग्रंथही ज्योतिःशास्त्राच्या इतिहासासंबंधी रचिलेला आहे. कोल्हटकरांच्या ग्रंथातील उपोद्घातात भारतीय ज्योतिःशास्त्राचा इतिहास व पूर्वीपासून पाश्चात्य राष्ट्रात या विषयांची झालेली उत्क्रांती दाखविली आहे. शं. बा. दीक्षित यांच्या प्रस्तुत ग्रंथाव्यतिरिक्त केरोपंत छत्रे यांचे, 'ग्रहसाधनांची कोष्टके' व श्री. केतकरांचे 'ज्योतिर्गणित' यांचा उपयोग झाल्याचे त्यांनी नमूद केले आहे. दीक्षित यांनी आपल्या ग्रंथांत ज्योतिःशास्त्र-












विषयक प्रयत्नांची जी माहिती दिली आहे त्यावरूनच मागील प्रयत्नांचे अवलोकन श्री. कोल्हटकरांनी केले आहे. भारतीयांच्या प्रयत्नांचे अवलोकन करीत असता दीक्षितांनी ज्या अनेक ग्रंथकारांना पाश्चात्यांनी काळाच्या दृष्टीने अलिकडे ओढण्याचा प्रयत्न केला त्यांच्या प्राचीनतेविषयी प्रमाणपूर्वक लिहिले आहे. श्री. कोल्हटकरांचा ग्रंथ, ग्रंथसंपादक व ग्रंथप्रसारक मंडळीतील ग्रंथमालेने प्रसिद्ध केला. चिकित्सकतेच्या दृष्टीने उल्लेखनीय ठरणारा या कालांतील आणखी एक ग्रंथ म्हणजे १९०६ साली त्र्यं. गुरूनाथ काळे यांचा 'भारतीय रसायनशास्त्र' हा ग्रंथ होय. प्रस्तुत ग्रंथातही या विषयीच्या पूर्वीच्या प्रयत्नांचे पृथक्करण केले आहे. ऐतिहासिक दृष्टीने केलेले शास्त्रांच्या अितिहासाचे अवलोकन करणारे हे ग्रंथ अेका दृष्टीने विशेष महत्वाचे आहेत. भारतीयांमध्ये मध्यंतरीच्या काळात ओसरलेली विज्ञानविषयक जिज्ञासा पुनश्च जागृत करणे ही एका परीने नव्या सांस्कृतिक परिवर्तनाची नांदीच होय, हे या साऱ्या ग्रंथकारांनी हेरलेले दिसते. ही जिज्ञासा जागृत करण्याच्या दृष्टीने विज्ञानाचे महत्व पटविणे, त्यासंबंधी प्राचीनांची नोंद करणे अवश्य होते. शास्त्रीय दृष्टिकोनाचे बाळकडू भारतीयांना सर्वस्वी नवे नाही. त्यांतील प्रायोगिकता आणि भौतिकाच्या विश्लेषणावर पाश्चात्यांनी दिलेला भर मात्र नवा आहे. तो आत्मसात करून घेण्याचा आत्मविश्वास तत्कालीन पिढीमध्ये निर्माण करण्याचा हेतू या ग्रंथामुळे साध्य झाला असे म्हणणे शक्य आहे.

## समारोप

प्रस्तुत लेखातून केवळ काही प्रातिनिधिक स्वरूपाच्या प्रयत्नांचे अवलोकन केले आहे. तथापि त्या अनुरोधानेही या काळातील शास्त्रीय वाङमयाच्या प्रेरणा, त्यातील विषयनिरूपण, त्यात जाणीवपूर्वक केलेली शास्त्रीय परिभाषेची निर्मिती, त्यात दिसून येणारी मूलगामी दृष्टी यांचे बदलते स्वरूप सहज लक्षात येते.

अगदी प्रारंभीच्या कालखंडात जेव्हा प्रथम इंग्रजी शिक्षण सुरू झाले तेव्हांच्या ग्रंथलेखनाची प्रेरणा अभ्यासक्रमात नेमलेल्या शास्त्रीय विषयांना पूरक व आवश्यक ठरणाऱ्या शालोपयोगी ग्रंथांच्या गरजेत रुजली होती, पुढील कालखंडातील ग्रंथलेखन बहुजन समाजाला शास्त्रीय विषयात सज्ञान करावे, त्यांची शास्त्रीय ज्ञानाविषयीची अभिरुचि अधिक वृद्धिंगत व्हावी या प्रेरणेतून झाले आहे. स्वयंप्रेरणेचे एक वेगळेच रूप या ग्रंथलेखनात व्यक्त झाले आहे. स्वदेशोद्धार, देशी भाषांची अभिवृद्धी, राष्ट्रीय शिक्षणाच्या कल्पनेची प्रत्यक्षात अंमलबजावणी करणे, लोकोद्धार, विज्ञानविषयक जिज्ञासा अधिकाधिक प्रगल्भ बनविण्याची त्या काळातील सुशिक्षितांची महत्वाकांक्षा अशा आणखी अनेक संमिश्र स्वरूपाच्या प्रेरणा १८७० नंतरच्या शास्त्रीय वाङमय निर्मितीला प्रेरक ठरल्या.

'शास्त्रग्रंथाला' 'अनेक विद्याविषयक बाल शिक्षा ग्रंथमाला,' 'बालबोध शाळा पाठमाला,' 'विवेकवाणी माला,' 'दाभोळकर ग्रंथमाला' अशा विविध ग्रंथमालानी या कालखंडात शास्त्रीय वाङमयाच्या प्रकाशनाची भरीव कामगिरी केल्याचे आढळते. सुशिक्षितामध्ये जागृत होणाऱ्या शास्त्रचिकित्सेचे जतन व संगोपन केल्याचे श्रेय या प्रकाशनमालांना निश्चित देता येते.

शास्त्रग्रंथमालांप्रमाणे विविध मासिकांनी या कालखंडात शास्त्रीय वाङमयाच्या निर्मितीच्या दृष्टीने, विज्ञानविषयक चिकित्सा आणि अभिरुची वाढविण्याच्या दृष्टीने केलेली कामगिरी लक्षणीय आहे. विविध शास्त्रातील सर्वांगीण ज्ञान देणे, त्यांतील नवे शोध, अध्ययनाच्या विविध दिशा, पद्धती, आणि निष्कर्ष यांचे समालोचन करणे अशा संमिश्र ध्येयवादाने निरनिराळी मासिके प्रेरित झाली होती. यात १८८५ साली जानेवारीमध्ये सुरू झालेले 'सृष्टिज्ञान' व नागपूर येथून प्रसिद्ध होणारे 'उद्यम' ही अत्यंत चिकित्सक स्वरूपाचे लेखन करणारी मासिके होत. या बाबतीत काही विशिष्ट शास्त्रांवरच माहिती पुरविणारी म्हणून 'शेतकी आणि शेतकरी,' 'आयुर्वेद,' 'चित्रमयजगत्,' 'धर्म,' ही मासिके देखील उल्लेखनीय आहेत. मराठीतील शास्त्रीय वाङमयाचे अवलोकन करीत असता या विषयाला वाहून घेतलेल्या मासिकांचा स्वतंत्र रीतीने विचार करणे आवश्यक








आहे, हे लक्षात घेऊन येथे केवळ त्यांचा नामोल्लेख केला आहे.

या काळातील शास्त्रीय विषयावरील ग्रंथातील विषयनिरूपणाचे स्वरूप प्रारंभीच्या मानाने बरेच सुबोध, सुगम आणि मनोरंजक झाले आहे, विषयाच्या व्याप्तीच्या दृष्टीने विचार केला तर त्यात विस्तार झाल्याचे दिसून येते. एकेका शास्त्रातील विविध विषयाचा विस्तृत विचार आता या ग्रंथातून येऊ लागला, त्याच विषयात पूर्वीपेक्षा अधिक सखोलता, चिकित्सकता आणि प्रगल्भता आली. प्रायोगिकतेवर लेखनातही अधिक भर देण्याची प्रवृत्ती दिसू लागली. बाळाजी प्रभाकर मोडक यांचे विविध ग्रंथ साक्ष पटविणारे आहेत. केवळ इंग्रजी ग्रंथाची भाषांतरे अथवा तर्जुमे न बठविता विषयाचे बारकाईने, सातत्याने सखोल अध्ययन करून त्या त्या शास्त्रीय विषयावर ग्रंथलेखन करण्याची प्रवृत्ती, विविध, ग्रंथात दिसू लागली. विषय आत्मसात झाल्यामुळे विज्ञानविषयक लेखनात सामान्यानाही सुलभ वाटावे इतके सुगम आणि सरस होऊ लागले.

शास्त्रीय विषयावर ग्रंथलेखन करीत असताना अर्वाचीन काळातील प्रारंभीच्या ग्रंथकारांनीही जाणीवपूर्वक प्रयत्न केले आहेत. यासंबंधीचा उल्लेख प्रस्तुत लेखिकेच्या जुलै १९६७ च्या 'नवभारता'तील शास्त्रीय वाङ्मयासंबंधीच्या लेखात आला आहे. ( नवभारत जुलै १९६७ पृ. १२ ) परिभाषा तयार करीत असता विविधशास्त्रातील विशिष्ट स्वरूपाच्या संज्ञा मूळ लॅटिन किंवा अिंग्रजीच कायम ठेवल्याचे आढळते. संस्कृत अथवा मराठीच्या आधारे त्यांचे रूपांतरसंज्ञांतर अनवश्यक ठरते. विषय बोध होण्याच्या दृष्टीनेही ते निरुपयोगी आहे. त्यामुळे विषय अधिक दुर्बोध होईल, त्यासंबंधीच्या समजुती मध्ये संदिग्धता राहील म्हणूनही रूपांतराचा आग्रह पुढील ग्रंथकर्त्यांनीही बाळगला नाही. क्रिया, परिमाण, घटक पदार्थांचे गुणधर्म यासंबंधीच्या सामान्य संज्ञा शक्य तेथे मराठी अथवा संस्कृतच्या आधारे तयार केल्या आहेत. केवळ संस्कृतावरच निर्वाह करून शास्त्रातील पारिभाषिक संज्ञा तयार करण्याचा आग्रह धरण्यास अनेक प्रकारचा गोंधळ निर्माण होईल अशी बाळाजी प्रभाकर मोडक यांची भूमिका होती. परंतु सामान्य संज्ञा बनवित असता त्यांनीही आवश्यक तेवढा संस्कृतचा आधार घेतला आहे. शास्त्रीय ग्रंथातील परिभाषा मूळ परदेशी शब्दांपेक्षा अधिक दुर्बोध होता कामा नये असे त्या काळातील ग्रंथकारांची याबाबत स्वीकारलेल्या भूमिकेवरून व परिभाषा निर्मितीच्या प्रयत्नासंबंधी त्यानी विविध ठिकाणी काढलेल्या उद्गारावरून दिसून येते. प्रगतिशील राष्ट्रांमध्ये शास्त्रीय परिभाषेसंबंधी अधिक उदार धोरणाचा अवलंब केल्याचे त्यांनी लक्षात घेतले आहे, तदनुसार आपले ग्रंथलेखन परिभाषेचा प्रश्न लिहितांनाच सोडवीत सातत्याने व चिकाटीने लेखन केले आहे. त्याच्या मुळाशी त्या पिढीत रुजरेली सत्यजिज्ञासा, ज्ञानोपासना, लोकहिताची तळमळच विशेषत्वाने असल्याचे दिसून येते. मराठी भाषेचा जाज्वल्य अभिमानही त्यांच्या वृत्तीत असल्याचे दिसून येते. अपरिहार्य त्या ठिकाणी मूळ इंग्रजी वा लॅटिन संज्ञा त्यांनी कायम ठेवल्या असल्या तरी त्यामुळे त्याचा हा भाषाभिमान यत्किंचितही आक्षेपार्ह ठरत नाही, त्या भाषाभिमानाचे स्वरूप संकुचित नव्हते, एवढे मात्र खरे. शास्त्रीय विषयावरील प्रगल्भ ग्रंथनिर्मितीचे सत्र चालू ठेवणे हे त्यांच्या उज्ज्वल आणि जाज्वल्य भाषाभिमानाचेच निदर्शक होय.

शास्त्रीय वाङ्मयाची निर्मिती करीत असता या काळातील ग्रंथकाराची प्रतिभा परिभाषेच्या भस्मासुराने कोळपून गेली नाही.

शास्त्रीय वाङ्मयाची निर्मिती होत असता तद्विषयक प्राचीनांच्या प्रयत्नांचे ऐतिहासिक दृष्टचा अवलोकन करणारे अनेक प्रयत्न या कालखंडात झाले. शास्त्रीय ज्ञानाचे आलोकन करीत असता एतद्देशीयांमध्ये उत्पन्न झालेल्या तौलनिक आणि चिकित्सक वृत्तीचेच हे निदर्शक नव्हे काय ?

आजही वेगवेगळचा विद्यापीठातून वैज्ञानिक शिक्षण देणाऱ्या शास्त्रांच्या अभ्यासक्रमांत मातृभाषांचा माध्यम म्हणून स्वीकार झाल्यावाचून या क्षेत्रातील मराठी ग्रंथरचनेची वाढ होणे शक्य नाही, असे म्हणणे यथार्थ ठरते.











मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

श्री. सेतु माधवराव पगडी

# मोगल मातबरखानाची अप्रकाशित पत्रे (१६८८-१७०५)

(२३) **मराठ्यांशी लढाया १६९५** या काळांत हणमंत (हणमंतराव निंबाळकर ?), शंकराराम (शंकराजीनारायण), केरू (केरोजी) व मल्हार वगैरे पंधरा मराठे सरदार हे दहाबारा हजार स्वारांचे सैन्य घेऊन निघाले आणि त्यांनी खानदेशच्या सुभ्याच्या दिशेने आक्रमण केले. त्यांनी तिकडील महालांत लुटालूट केली आणि लोकांचा छळ केला. माझ्या फौजदारी (फौजदार म्हणजे जिल्हाधिकारी) अंमलाच्या प्रदेशांत घुसण्याचा त्यांचा हेतु होता. मला ही बातमी लागली. माझ्या हाताखाली प्रदेश म्हणजे पुंड मराठ्यांचे आगर होय. ते लोक इकडील डोंगरदऱ्यांच्या आश्रयाने राहातात. आणि आमच्या किल्ल्यावर हे आघात करण्याच्या तयारीत असतात. पण देशाचे संरक्षण व्हावे आणि लोकांत शांतता नांदावी या हेतूने मी तेलंगराव, रावतमल झाला, आणि काका मन्सबदार यांना बरोबर पथके देऊन गुल्शनाबाद- (नाशिक) च्या ठाण्याकडे रवाना केले. तेथे पथक तैनात केल्याची हकीकत वाकेनविसांच्या बातमीपत्रांवरून कळलीच असेल. अडतीस जुलूस रजब महिन्याच्या बावीस तारखेस मी उल्लेखिलेले अधिकारी, गुल्शनाबादचा नायब ठाणेदार मुहंमदशफी आणि जवळपासचे ठाणेदार हे मराठ्यांचा मोड करण्यासाठी पुढे रवाना झाले होते. रजब महिन्याच्या चोवीस तारखेस (अठ्ठावीस फेब्रुवारी इ. स. सोळाशे पंचाण्णव) रघोजी हा हातोदा (पाटोदा) परगण्यांतून निघाला. त्याने मुहंमद सादिकला बरोबर घेतले. मोठे पत्रक घेऊन तो मनमाडला पोहोंचला. तेथे तो आमच्या सैन्याला जाऊन मिळाला. रजबच्या सव्वीस तारखेस (दोन मार्च १६९५) बातमी आली की मराठ्यांनी बरीच लूट आणि गुरढोरेंही गोळा केली असून ते चांदवड आणि अंकीटंकीच्या किल्ल्याच्या पायथ्याशी असलेला कर्णाळा घाट ओलांडीत आहेत. माझे अधिकारी एकमताने त्यांच्यावर चालून गेले. त्याच रात्री मोठी हातघाईची लढाई झाली. उभयपक्षाचे अनेक लोक जखमी झाले. आमच्या सैन्याला शर्थ करावी लागली. शत्रूपैकी हणमंतराव (निंबाळकर ?) याचा भाचा मारला गेला. शेवटी शत्रू आमच्यासमोर टिकाव न धरून पळून गेले. त्यांनी धरून नेलेली गुरे ढोरे आमच्या हाती लागली आणि मालकांच्याकडे परत करण्यात आली. आमचे अधिकारी मालेगावजवळ दोनप्रहरपर्यंत तळ देऊन होते. रात्रीच्या शेवटच्या प्रहरी ते शत्रूच्या पाठलागावर निघाले. त्यांना मार देत देत त्यांनी शत्रूला गोदावरीच्या पलीकडे घालविले. पुन्हा एकदा त्यांनी गोदावरीच्या पलीकडे शत्रूची गाठ घेतली आणि कित्येकाना ठार मारले. शत्रूचे बरेच लोक जखमी झाले. बाकीचे दुर्जीच्या घाटावरून पळून गेले. आपल्याला मोठा जय मिळाला. या लढाईत ज्यांनी मर्दुमकी गाजविली त्यांची यादी वेगळी पाठविली आहे ती मिळेल.

गेल्या वर्षीही याच लोकांनी गुल्शनाबाद इलाख्यात काफरांशी लढताना अशीच मर्दुमकी गाजविली होती. त्यांच्यावर अद्याप हुजुरांची कृपा झाली नाही. त्यांना त्यांच्या योग्यतेप्रमाणे बक्षिसे मिळावीत. त्यांपैकी काहींना मी मन्सबीची आश्वासने दिली आहेत. त्यांना मन्सबी मिळाल्या म्हणजे त्यांचा माझ्यावर विश्वास राहील.

(२४) **अधिकाऱ्याची शिफारस १७००** हिलाल हा गेल्या अकरावर्षापासून माझ्या फौजेत तैनात आहे. तो शिपाईगडी असून कामाचा माणूस आहे. त्याने अनेक कामगिऱ्या पार पाडल्या आहेत. तो एकदाही सैन्यापासून अलग झाला नाही. त्याला मन्सब लहान. त्याचे कुटुंब मोठे. त्याची मोठी दुःस्थिति आहे. तो आता आपल्या सेवेत आला आहे. त्याला मन्सब वाढून मिळावी ही विनंति.

(२५) **विशाळगडच्या विजयाबद्दल अभिनंदन** १७०२ आपण सखरलना (खेळणा, विशाळगड) जिंकून घेतला हे ऐकून अतिशय आनंद झाला. मी परमेश्वराचे आभार मानले. आणि नगारे आणि शहाजणे वाज-








विले. या विजयाबद्दल मी नम्रतापूर्वक पन्नास अश्रफ्या पाठवीत आहे. स्वीकाराची कृपा व्हावी.

(२६) **मुलगा अबुमुहंमद याजविषयी,** माझा मुलगा अबू मुहंमद हा चौदा वर्षाचा झाला आहे त्याचे शिक्षण झाले आहे. त्याला कुराण तोंडपाठ येते. तो आता अरबी शिकत आहे. त्याला मी हुजुरांच्या सेवेत पाठवीत आहे. त्याला मन्सब देण्यात यावी ही विनंति.

(२७) **भाच्यांविषयी विनंति.** माझे सख्खे भाचे शेख अहंमद आणि जैनुल आबिदीन हे तरुण आणि सुसंस्कृत आहेत. शेख अहमद याला शंभर जातची मन्सब आहे. जैनुल आबिदीन यास जी मन्सब आहे ती चारमाही आणि चतुर्थांशाची आहे. गेली नऊ वर्षे ते कोकण प्रदेशात मेहनतीने आणि मनःपूर्वक कामगिरी बजावीत आहेत पण त्यांचे कुटुंब मोठे आहे. मन्सब लहान व उत्पन्नही लहान त्यामुळे ते मोठ्या अडचणीत आहेत. मराठ्यांना ज्या पद्धतीने मन्सबी देण्यात येतात त्याच पद्धतीने यांना मन्सबी मिळतात. मला सहामाही मुक्रर आहे. त्याच हिशेबाने मला मासिक मुशाहिरा ठरला आहे. मरहूम मुल्ला अहंमद आणि त्याचा मोठा भाऊ शेख अब्दुल्ला त्यांना पांचमाही मुक्रर असून एक चतुर्थांशाची त्यांना माफी मिळाली आहे. शेख अहंमद आणि जैनुलाबिदीन यांना हुजुरात पाठवीत आहे. त्यांना मन्सब वाढून मिळावी ही विनंति.

## (२८) मुख्य प्रधान असदखान याला पत्र १६९८

गेल्यावर्षी धनाजी वगैरे मराठ्यांचे सरदार यानी वैजापूरला वेढा घातला होता. माझ्या अधिकाऱ्यांनी त्यांचा मोड केला. मराठे सरदारांच्या मनात या पराजयाबद्दल सूड उगविण्याचे होते. ही गोष्ट मी आपल्या कानावर घातली होती, आणि मला बालाघाटावर जाण्यास परवानगी मिळावी अशी विनंति केली होती. यावरून तुमच्या अधिकारांतील महालात तुम्हाला योग्य वाटेल त्याठिकाणी तुम्ही तळ देऊ शकता असे मला सांगण्यात आले. आज्ञेप्रमाणे मी कल्याणच्या ठाण्यावर माझ्यातर्फे एक नायब नेमला. मी स्वतः गुल्शनाबादेस (नाशिक) आलो. तेथे काही दिवस थांबलो. तेथे मी आपल्या पथकांची पुनर्रचना केली आणि नवीन स्वार आणि पायदळ उभे केले. मी येवल्याला येऊन तेथे छावणी केली. सैन्याच्या भोवती पहाऱ्याची आणि गस्त घालण्याची व्यवस्था केली. माझ्या अधिकाऱ्यांनी रोज दहाबारा कोसपर्यंत पुढे जाऊन गस्त घालावी अशी मी व्यवस्था केली. वाटेत शत्रू भेटले की त्यांचा मोड करावा. माझ्या या व्यवस्थेमुळे वैजापूर परगण्याच्या रयतेत शांतता नांदू लागली. शत्रूला माझ्या इलाख्यात प्रवेश करणे लाभाचे वाटले नाही. शंकराराम आणि त्याच्या बरोबरचे पंधरा मराठ सरदार मोठे सैन्य बरोबर घेऊन कन्नड, वेरुळ या परगण्यात आणि औरंगाबादच्या भोवती पसरले. त्यानी अनेक खेड्यातून गुरेढोरे लुटली. लोकांच्या येण्याजाण्याच्या वाटा त्यानी बंद पाडल्या. व्यापार थांबला. लोकांना अतिशय त्रास होऊ लागला. मी काफरावर चालून जाऊन त्यांचा मोड करण्याचा ठाम निश्चय केला. शत्रू हरप्रकारच्या संधीची वाट पाहात होते. मी जर त्यांच्या दिशेने (कन्नड, वेरुळ) चालून गेलो तर ते माझा इलाखा रिकामा आहे असे पाहून शत्रू माझ्या जिल्ह्यावर चाल करून येतील अशी मला शंका होती. म्हणून मी आपला तळ हलविला नाही. मी आपले स्वार आणि पायदळ हे सर अफराजखानाच्या दिमतीचा मुहंमद सादिक आणि रघूजी या अधिकाऱ्यांच्या बरोबर देऊन बेचाळीस जुलूस रमजान महिन्याच्या अठरा तारखेस (वीस मार्च १६९८) त्यांना मराठ्यांच्याविरुद्ध पाठविले. आमचे सैन्य दोन मजला ओलांडून गेले तोच त्यांना कळले की मराठे कन्नडच्या परगण्यात आहेत. आमची फौज त्यांच्या पाठलागावर गेली. तेथून मराठे पळाले ते बुऱ्हाणुद्दीनच्या दर्ग्याकडे (खुल्दाबाद) पसरले. ते स्थळ लुटून घ्यावे असे त्यानी ठरविले. आमच्या सैन्याने सव्वाल महिन्याच्या तीन तारखेस (चार एप्रिल १६९८) पंचवीस कोसाची मजल मारली आणि ते मराठ्यांच्यावर तुटून पडले. मराठे टिकाव धरू शकले नाहीत. त्यानी पळ काढला. रोजा- (खुल्दाबाद) चे लोक त्यांच्या पीडेतून मुक्त झाले. कन्नड, खंडाळा, गंडापूर (गंगापूर), वेरुळ इत्यादि परगण्यातील गुरेढोरे धरून नेली होती ती सोडवून त्यांच्या मालकांकडे परत करण्यात आली.








यानंतर मराठे फुलंब्रीकडे गेले. आमचे सैन्य आपल्या तळापासून लांब चालून गेले होते असे असूनही त्याने पायदळासाठी म्हणून अंमळ विश्रांति घेतली. यानंतर मराठ्यांचा पाठलाग करीत माझे सैन्य फुलंब्राला पोहोचले. मराठ्यांनी फुलंब्रीला वेढले होते. आणि तेथील गुरेढोरे धरली होती. तोच सव्वाल महिन्याच्या चार तारखेस ( पाच एप्रिल १६९८ )

( येथे एक पान गहाळ आहे )

ज्यांनी कामगिरी केली आहे त्यांची यादी पाठवीत आहे. त्यांना मन्सबीची बढती देण्यात येऊन त्यांच्यावर कृपा करण्यात यावी.

(२९) **गाजिउद्दीन फीरोज जंग सिपाहसालार यास** (१७०४) आपल्या पत्रात आपण पुढीलप्रमाणे कळविले आहे :

शिवा ( शिवाजी ) जाधव आणि इतर मराठे सरदार हे तीस हजारचे सैन्य घेऊन सुभे तेलंगण, हैद्राबाद आणि वऱ्हाड या प्रांतावर आक्रमण करून आले. त्यांनी चांद्याच्या राजाचा माणिकदुर्ग या किल्ल्यापाशी तळ दिला होता. आमचे सैन्य रात्रंदिवस मजला मारून पवनारच्या जवळ त्यांच्यावर तुटून पडले. त्यांचे अनेक लोक ठार झाले त्यांनी धरून नेलेली अगणित अशी गुरेढोरे सोडविण्यात आली. मराठे मोठी दुर्दशा होऊन पळून गेले.

या बातमीने अतिशय आनंद झाला. आपल्या सैन्याच्या पराक्रमाने मराठे निष्प्रभ होऊन जातील याची खात्री होती. मराठे आपल्या सैन्यासमोरून पळ काढीत वऱ्हाडकडे आले. ते दुर्जीचा घाट उतरून खानदेशाकडे वळले. त्यांनी तिकडे लुटालूट सुरू केली.

रघू मन्सबदार हा पाचशे स्वार आणि दोन हजार प्यादे, बर्कंदाज आणि तीरंदाज यांची पथके घेऊन पाटोद्याच्या परगण्यावर आहे. मराठे या भागात येत असल्याची बातमी मला कळताच मी रघूला कळविले की त्यांचा प्रतिकार करावा. त्याप्रमाणे त्याने मराठ्यांच्यावर हल्ला केला. तीन प्रहर पर्यंत हातघाईची लढाई झाली. रघूने मराठ्यांना हटविले. अनेकांना मारून अगर जखमी करून त्याने मराठ्यांना गोदावरीच्या पलीकडे घालविले. हे सर्व आपल्या कृपेचे फळ होय. आता आपण त्या प्रांतात वास्तव्य करून आहात. आता मराठ्यांना डोके वर काढण्याची काय हिंमत होणार.

(३०) **गाजिउद्दीन फीरोजजंग यास.** आपण चौंदचा किल्ला जिंकून घेतला असे कळले. ही बातमी ऐकून अतिशय आनंद झाला. आपल्याला प्रतिदिन असेच विजय मिळत जावोत.

(३१) **चीनकिलीच खान ( भावी निजामुल्मुल्क ) याला पत्र–** आपले पत्र मिळाले. त्यांतील मजकूर असा " मराठयांचा सरदार धनाजी जाधव याने कल्याण आणि गुल्शनाबाद या प्रांताकडे आक्रमण करून जाण्याचा बेत केला. आमच्या फौजेने त्याला मार देत कुंवारीच्या (कोरीगड) किल्ल्याजवळ नेऊन घातले. धनाजीने कुंवारी ( कोरी ) किल्ल्याचा आश्रय घेतला असून तो कल्याणभिवंडीकडे येण्याचा विचार करीत आहे. आमच्या फौजाहि नूर घाटावर (भोर) पोहोंचल्या. शत्रू घाटावरून खाली उतरला तो तुमच्या जिल्ह्यांत पसरेल- तुम्ही आपली फौज तयार ठेवावी. आमची फौजहि लवकरच तिकडे येईल."

आपल्या या पत्राने आम्हाला मोठे बळ प्राप्त झाले. दैव आमच्या फौजेची साथ करीत आहे. शत्रू दुर्दशेला पोहोंचल्याशिवाय राहाणार नाही. तुमच्यासारख्या बनराजाशी मुकाबला करण्याची त्या कोल्ह्याची हिंमत काय ? मी तयार आहे. आपल्या ठाण्यांचा बंदोबस्त करून सावधगिरीने वागत आहे. शत्रू इकडे आले तर तिकडून आपण आणि इकडून मी अशा उभयतांच्या मध्ये त्यांना कोंडून त्यांचा नक्षा उतरवू. एकालाहि जिवंत जाऊ देणार नाहीं.

(३२) **मुख्य बक्षी ( जुल्फिकारखान ? ) यास–** मराठयांनी सर्वत्र बंडाळी सुरू केली आहे. कल्याण येथे आपली फौज थोडी आहे. सरंजामही थोडा आहे. मला बरेच कर्ज झाले आहे. धान्याचे भाव घसरले आहेत, धान्याला गिऱ्हाईक नाही. त्यामुळे गेली तीन वर्षे माझ्या जहागिरीच्या महालांतून एकतृतीयांश उत्पन्नहि झाले नाही. दोन वर्षापासून मी एक हजार स्वार बाळगले. हे स्वार शिबंदीच्या मोबदल्यात होते. त्यांचा ठरलेला जहागीर सरंजाम मला मिळाला नाही. सरकारांतून मला तीस हजाराचे देणे आहे.








त्र्यंबकच्या वेढ्याच्या वेळी मरहूम फाजलखान यांच्या मोहोरेनिशी मला जे आज्ञापत्र आले त्यांत मला आश्वासन देण्यात आले होते की त्र्यंबक जिंकून घेण्यात जो काही खर्च येईल तो सरकारी खजिन्यांतून दिला जाईल. त्या भरवंशावर मी सावकारांकडून एक लाख वीस हजार रुपयांचें कर्ज काढले आणि त्र्यंबकचा किल्ला जिंकून घेतला. त्यानंतर मला तीस हजार रुपये रोख बक्षीस म्हणून देण्यात यावे असा हुकूम झाला. पण अद्यापपर्यंत ती रक्कम मला मिळाली नाही. माझे सावकार कर्जाचा तगादा करीत आहेत.

केवळ सरकारच्या मोहिमा पार पडाव्या म्हणून कोंकणात उतरल्यापासून मी नेमलेल्या पथकाहून अधिक असे पांचशे स्वार आणि तीन हजाराचे पायदळ बाळगले. आणि माझ्या फौजदारीत ( अधिकारात ) असलेल्या ठाण्यांचा उत्तम बंदोबस्त ठेवला. मी कर्जबाजारी झालो आहे. माझी परिस्थिति चांगली नाही.

या सुमारास पट्ट्याचा किल्ला मराठ्यांच्या ताब्यात गेला. मराठ्यांचे आक्रमण, प्रत्येक जिल्ह्यांत सुरू झाले. चहूकडून त्यांच्या धामधुमीच्या बातम्या येऊ लागल्या. यावेळी आमच्या ठाण्यांतून योग्य ते पथक आणि सरंजाम ही असली तर अडचणीच्या प्रसंगी उपयोगी पडतील. माझ्या हाताखाली बालाघाट आणि घाटाखालची ठाणीं आहेत. स्वार आणि प्यादे यांच्यात भर घालून ठाण्यांतून मी ठेवू शकेन. म्हणजे सगळ्या ठाण्यांचा बंदोबस्त खबरदारीने करता येईल.

यापूर्वी मी राउतराव ओकला मन्सबदार आणि रुस्तमबेग जमादार यांना सिन्नरच्या ठाण्याचे रक्षण करण्यासाठी पाठविले होते. मराठे सरदार बरेच सैन्य घेऊन तवलगांव येथे पोहोंचले. आणि तेथील रयतेला त्यांनी पीडा देण्यास सुरवात केली. राउतराव आणि रुस्तमबेग हे सफर महिन्याच्या तेवीस तारखेस आपल्या ठाण्यांतून निघून मराठ्यांच्यावर चालून गेले. झालेल्या लढाईत त्यांना प्रत्येक तलवार आणि भाले यांच्या पांच पांच जखमा होऊन ते कामी आले. त्यांची मुले मोठी असून ठाणें मजकुरांत सरकारी कामावर आहेत. सरकारची त्यांच्यावर कृपा व्हावी. सोबत यादी पाठविली आहे ती प्रमाणे त्यांच्या मन्सबीत वाढ व्हावी. आणि मयतांच्या जहागिरी त्यांच्या मुलांच्या नांवे कायम करण्यांत याव्या. म्हणजे त्यांचा उत्साह वाढेल आणि त्यांची पथके परागंदा होणार नाहीत.

किल्ले पट्टा परत जिंकून घेणे आवश्यक आहे. नाहीतर मराठयांची धामधूम थांबविणे आणि ठाणी सुरक्षित राखणे कठीण जाईल. विनंति की हुजुरांतून एखादा सरदार उत्तम सैन्य देऊन पाठवावा. हा किल्ला जिंकण्याचा कामावर त्याला नेमावा म्हणजे तो तडक येऊन किल्ल्याला वेढा घालील.

किंवा आवश्यक तो सरंजाम आणि सैन्य ही मला देण्यात यावी म्हणजे मी घाटावरची आणि घाटाखालची ठाणी यांचा बंदोबस्त राखून किल्ला ( पट्टा ) जिंकून घेण्यास झटेन.

त्र्यंबकचा किल्लेदार कदीमकुलीखान वारला. त्याचा मुलगा लहान आहे. तो कर्जबाजारी आहे. सावकाराचा तगादा चालू आहे. त्याची परिस्थिति शोचनीय आहे, त्र्यंबकचा किल्ला त्याच्याने सांभाळणे शक्य नाही. हुजुरातून कोणी तरी उमदा आणि अनुभवी मनुष्य किल्लेदार म्हणून पाठवावा. नाहीतर त्या किल्ल्यावर भयंकर संकट कोसळेल ( किल्ला आपल्या ताब्यातून गेला ) तर त्याचा परिहार करणे कठीण होईल.

( ३३ ) **मिर्जायार अलीबेग यास–** आपले पत्र मिळाले, त्यांत बादशहाचा हुकूम की तुम्ही शत्रूच्या सरदाराचा वेळीच मोड का केला नाही. कामे बिघडवून टाकता. त्याबद्दल विनंति की काफराच्या विरुद्ध जिहाद करण्यात माझ्याकडून मुळीच कसूर झाली नाही आणि होणार नाही. ज्या ज्या वेळी मराठे इकडच्या भागात आले त्या त्या वेळी त्यांचा मोड करण्यात आला आहे. माझ्या इलाख्यात ते टिकू शकत नाहीत. बरेच मराठे आपल्या चाकरीत येत आहेत व येतील.

कांही दिवसापूर्वी मराठ्यांच्या किल्ल्यांना भोवतालच्या प्रदेशातून रसद आणि कुमक मिळाली त्यामुळे ते किल्ले जिंकून घेणे जमले नाही. या सुमारास मी फिरंग्याशी तह केला. अट ही की त्यांनी (पोर्तुगिजानी) मराठ्याना आपले कट्टर शत्रू समजावे आणि आपल्या स्वतःच्या इलाख्यातून मराठ्यांच्या किल्ल्याना रसद जाऊ देऊ नये. परमेश्वर कृपेने मराठ्याचे किल्ले फत्ते होतील इतकी मेहनत करूनही बादशहानी म्हणावे की मोहिमेत मी







मन घालीत नाही आणि कामे नासतात तर हे माझे दुर्दैवच म्हटले पाहिजे.

( ३४ ) **सदरुस्सुदूर ( न्यायाधीश ) सियादतखान** यास, आपले पत्र मिळाले. त्यांत म्हटले आहे की एतिमादखानाच्या पत्रावरून तुमच्या लोकानी पोर्तुगिजांची खेडी लुटली असे कळल्यावरून बादशहाची गैर मर्जी झाली आहे. फिरंगी हे बादशहाची आज्ञा मानतात आणि दर वर्षी व्यापारानिमित्त सुरतेला माल पाठवीत असतात. बादशहानी आज्ञा केली आहे की पोर्तुगिजांच्या खेड्यात जो माल लुटला आहे तो त्याच्या मालकाकडे परत करावा. माल परत मिळाल्याचा राजीनामा पोर्तुगिजाकडून घेऊन मीर सालेह गुर्जबर्दार याच्याबरोबर पाठवून द्यावा. आणि यापुढे पोर्तुगिजाशी भांडू नये. मी याचे उत्तर मुख्य बक्षींच्याकडे पाठविले आहे. आपल्याशिवाय माझ्यावर मेहरबान असा कोण आहे म्हणून मी वस्तुस्थिति आपल्यासमोर मांडीत आहे. फिरंग्यानी ( पोर्तुगीज ) मराठ्याशी संगनमत केले. मराठ्यांच्या कबिल्याना त्यानी आपल्या इलाख्यात आश्रय दिला. ही हकीकत यापूर्वी मी हुजुरात कळविली होती.

आमच्या प्रदेशातील रयत पोर्तुगिजांच्या इलाख्यात जाऊन राहिली होती. त्यानी परत आमच्या इलाख्यात येऊन वसावे अशी पोर्तुगिजांची इच्छा नव्हती. त्यामुळे आमचे सैन्य त्यांच्या इलाख्यात पाठविण्यात आले. पोर्तुगिजाना चांगलाच तंबी देण्यात आली. आमच्या सैन्याने त्यांची देवळे जाळली, आमची रयत, रयतेची बायकामुले, गुरेढोर याना आम्ही परत घेऊन आलो आणि त्यांना जमीनदारांच्या हवाली केले. अशा रीतीने आमच्या रयतेला आमच्या इलाख्यात पुन्हा वसविण्यात आले.

आता हुजुरांची आज्ञा झाली आहे. तीस अनुसरून पोर्तुगिजावरचे आक्रमण परत घेण्यात आले आहे. पोर्तुगिजाशी तह करताना पुढील मंडळी साक्षीदार होती. खान फोरोजजंगाच्या फौजेत तैनात असलेला हाजी मुहंमदबेग मन्सबदार, सिद्दी खैरियतखान याचा वकील काजी इब्राहीम, एतिमादखानाचे प्रतिनिधि बालूलखान आणि इनायतबेग. तहाच्या अटी अशा की पोर्तुगिजांनी यापुढे मराठयांशी एकी करू नये. तीन फिरंगी कैदी, इतर कैदी आणि गुरेढोरे यांना पोर्तुगिजांकडे परत करण्यात आले. पोर्तुगिजांच्या कडून राजिनामा घेऊन तो गुर्जबर्दाराबरोबर पाठविला आहे. इस्लामच्या आज्ञांचा प्रचार आणि लोकांना वसविण्याचे कामही मी मनःपूर्वक करीत आहे. या उध्वस्त इलाख्यात मी दीडशे खेडी पुन्हा आबाद केली. इतकी मेहनत करूनही माझ्या मन्सबीत घट करण्यात आली आहे. आणि माझ्यावर रोष झाला आहे. हे माझे दुर्दैव होय. आपण योग्य वेळ पाहून हुजुरांच्या कानावर ही गोष्ट घालावी आणि माझ्या मन्सबीत जी घट करण्यात आली आहे ती परत बहाल करावी.

( ३५ ) **सुरतेचा अधिकारी एतिमादखान यास—** आपण शेजारी आहोत. या भागात आपले काही काम असल्यास मला निस्संकोचपणे सांगावे. काजी इब्राहीम आणि आपण पाठविलेले इनायतबेग यांच्या संमतीने पोर्तुगिजाशी तह झाला. त्यांचे कैदी आणि गुरेढोरे ही परत करण्यात आली. त्यांच्या व्यापाऱ्यांची सुरतेला ये जा सुरू झाली. दर्याची वाट पूर्वीप्रमाणे मोकळी झाली. हे आपल्याला पूर्वी कळविले आहे. इनायतबेग यांनीही आपल्याला सांगितले असेलच. आपण हुजुरात लिहाल तर मी काय केले या संबंधी आपण दोन ओळी लिहाव्यात. सलाबतखानाच्या नावे लिहिलेले वरील अर्थाचे पत्र माझ्याकडे पाठवावे म्हणजे येथून दरबारातील माझ्या वकीलाकडे पाठवीन.

( ३६ ) **याकूतखान यास पत्र—** मराठ्यांनी राजमाचीच्या किल्ल्यात आपला तळ दिला आहे. तेथून ते कर्नाळयाच्या शिबंदीला मदत करीत असतात. किल्ल्याच्या भोवती आमची खेडी ( बादशाही इलाख्यातील ) आहेत तीत ते मधून मधून धामधूम करीत असतात. यामुळे त्या भागात मोठी अशांतता होत असते. मी निश्चय केला आहे की कर्नाळयाच्या किल्ल्याला वेढा घालून तो आपल्या ताब्यात आणावा, आणि लोकांना पीडा देणारा काटा काढून टाकावा. कर्नाळा किल्ल्यावर पुरेशी रसद नाही, असे समजले आहे. हीच वेळ किल्ला जिंकून घेण्याची आहे. मी कर्नाळयाच्या पायथ्यापाशी सैन्य पाठविले आहे. जवळपासची भाताची आणि इतर धान्याची पिके उध्वस्त








करावी अशी सैन्याला सूचना देण्यात आली आहे. म्हणजे किल्ल्यातील लोकांना रसद मिळू शकणार नाही. तुमच्यात आणि माझ्यात पूर्वीपासून मैत्री आणि एकमत आहे. हे काम सरकारचे आहे. आपण आपल्याकडून कर्नाळ्याकडे येणाऱ्या दर्याच्या वाटा रोखून धराव्या. म्हणजे खांदेरी आणि कुलाबा येथून कर्नाळ्याला मदत पोहोचू शकणार नाही. आम्ही इकडून खुश्कीच्या मार्गाने त्यांच्यावर हल्ला करू. म्हणजे किल्ला फत्त होईल.

( ३७ ) **याकूतखान यास पत्र** पोर्तुगिजांनी मराठ्यांशी संगनमत केले आहे त्यांनी मराठ्यांच्या कबिल्यांना आपल्या प्रदेशात आश्रय दिला आहे. मराठे बादशाही इलाख्यावर हल्ले करतात आणि लुटीचा माल निम्मा स्वतः घेतात ( निम्मा पोर्तुगिजांना). यामुळे आमच्या या प्रदेशात भयंकर अंदाधुंदी माजली आहे आणि इलाख्याचा खरा बंदोबस्त होत नाही. पोर्तुगीज इलाख्याच्या आश्रयामुळे मराठ्यांच्या जमातीला बळ आले असून ते दिवसेंदिवस वाढत आहे. मी पोर्तुगिजांना समजविले की ही वागणूक बरी नाही. तुमच्यावर बादशहाचा कोप होईल. तुम्ही मराठ्यांना आपल्या प्रदेशात आश्रय देऊ नका. पण त्यांनी माझे म्हणणे ऐकले नाही. मी काही काळ हे सहन केले.

या सुमारास श्यामजी मोरोपंत हा खांदेरीच्या किल्ल्याहून निघून पोर्तुगिजाकडे आला. पोर्तुगिज आणि मराठे हे एकमत झाले असून भिवंडीवर हल्ला करून ते उध्वस्त करून टाकण्याचा त्यांचा बेत ठरला आहे. या लोकांना चांगली अद्दल घडविल्याशिवाय ते ताळ्यावर येणार नाहीत असा मी विचार केला. तुमची आणि आमची मैत्री आहे. माझा विचार असा आहे की या महिन्याच्या सतरा किंवा एकोणीस तारखेस (पोर्तुगीज इलाख्यावर) स्वारी करावी. मराठ्यांचे कबिले फिरंग्याच्या प्रदेशात आहेत. या आश्रयामुळे मराठ्यांना जोर चढला आहे. त्यांना (कबिले), पकडून कैद करावे. या कामात त्यांनी (मराठे व पोर्तुगीज) यांनी प्रतिकार केला तर त्यांना मारून काढावे. तुम्ही पण साष्टीच्या बाजूने स्वारी करावी. आणि फिरंग्यांना शिक्षा करावी म्हणजे ते यापुढे मराठ्यांना आश्रय देणार नाहीत. आपण ही गोष्ट कराल अशी खात्री आहे. मसलत घडून येईपर्यंत ती गुप्त ठेवण्याची आपल्या अधिकाऱ्यांना सूचना देऊन ठेवावी.

( ३८ ) **याकूतखान यास–** एतिमादखान यांनी आपल्याला पत्र लिहिले ते पाहाण्यात आले. नूरमुहंमदाच्या हाती आपण पत्र पाठविले ते मिळाले. माझ्यापाशी जे सैन्य आहे. ते मराठ्यांचे किल्ले जिंकून घेण्यासाठी आहे. सिद्धगड जिंकून घेण्यात आला आहे. इतर किल्ले जिंकण्याची मसलत चालली आहे. अशावेळी फिरंग्याशी बिघाड होणे नको. त्यांनी बादशहाचा हुकूम आणून तह केला आहे. त्यांचे अपराध माफ करावे म्हणून बादशहाची आज्ञा झाली आहे. आता त्यांच्यात आणि माझ्यात काही तक्रार राहिली नाही. आपणही माझ्याकडून पोर्तुगिजांची खातरजमा करावी. काजी इब्राहीमच्या हस्ते यापूर्वी आपल्याला लिहिण्यात आले आहे. साष्टीचे फिरंगी अधिकारी यानाही आपण लिहावे. मी पण त्याना खातरजमेचे पत्र लिहीत आहे.

( ३९ ) **सुरतेचा अधिकारी एतिमादखान यास १६९३ –** आपले पत्र मिळाले. पोतुगिजाबरोबर ज्या कटकटी झाल्या त्याची हकीकत मोठी आहे. त्याचा सारांश असा :

मी कोकणात उतरून चार वर्षे झाली. मराठ्यांच्या उपद्रवामुळे तळकोकणची रयत जव्हार, रामनगर इत्यादि भागात निघून गेली होती. पहिल्यावर्षी मी रयतेचे समाधान करून तिला परत आणली आणि अशा रीतीने सहाशे खेडी पुन्हा आबाद केली. दुसऱ्या वर्षी (इ. स. १६९१) पोर्तुगिजांनी मराठ्यांच्या कबिल्यांना आपल्या इलाख्यात आश्रय दिला. पोर्तुगीज आणि मराठे एक झाले आणि त्यानी बकसतगड (बतनगड) वर मोठा आघात केला. आमच्या खेड्यातील शेतकरी पोर्तुगीज इलाख्यात जाऊन राहिले, त्यामुळे कल्याणचे ठाणे सुदृढ राहण्याचे चिन्ह दिसेना. तिसऱ्या वर्षी (१६९१–९२ त्यानी कर्नाळ्याच्या किल्ल्यावर मोठा आघात केला (किल्ला घेतला). किल्ल्याच्या शिबंदीला ते रसदेचा सारखा पुरवठा करीत. मराठ्यांच्या या धामधुमीमुळे रयत








फिरंग्यांच्या ( पोर्तुगिजांच्या ) मुलुखात जाऊन राहिली. मी पोर्तुगिजांना पुष्कळ समजाविले पण काही उपयोग झाला नाही. मराठ्यांनी पट्टा किल्ला घेतला. पोर्तुगीज आणि मराठे एक झाले. साष्टीचा पोर्तुगीज सुभेदार किस्पनदामेलो याने श्यामजी मोर देवकर या मराठा सरदाराला मोठ्या सैन्यानिशी खांदेरीहून बोलाविले आणि त्याला ठाणे गावात आश्रय दिला. त्यांनी ठरविले की एक होऊन माहुलीच्या किल्ल्यावर आणि भिवंडी गावावर हल्ला करावा. कोकणातील ठाण्यांची स्थिरता माहुली किल्ल्यावर अवलंबून आहे. म्हणून या संकटाचा वेळीच इलाज करावा म्हणून मी पोर्तुगीज हद्दीत सैन्य पाठविले. त्यांच्या हद्दीत गेलेली आमची रयत परत आणावी आणि मराठे सरदारांचे कबीले आढळले तर त्यांना कैद करून आणावे. ही कामे सैन्याला सांगण्यात आली होती. पोर्तुगीज आणि मराठे एक होऊन आमच्याशी लढू लागले. कल्याणचे ठाणे शांत आणि आबाद राहावे अशी त्यांची इच्छा नव्हती. नाहीतर मला पोर्तुगिजांशी भांडण्याचे काय कारण होते.

याकूतखानाने मला पत्र लिहिले आहे. त्यात ते म्हणतात, दोन वर्षे झाली. बादशहाकडे चार घोडे पाठवावयाचे होते. साष्टीच्या पोर्तुगीज सुभेदाराने ते अडकवून ठेवले. आहेत. ते सोडून द्या म्हणून लिहिले तरी त्याचा उपयोग होत नाही. बादशहासाठी पाठविलेले घोडे पोर्तुगीज अडकवून ठेवतात यावरून पोर्तुगिजाना किती गर्व चढला आहे याची कल्पना येईल. बादशहासाठी पाठविलेल्या घोडयाबद्दल ही वागणूक तर इतरांची काय कथा. योग्य सल्लामसलतीने याचे उट्टे काढता येईल.

(४०) **खैरियतखान यास**, आपले पत्र मिळाले. आपण लिहिता की "पोर्तुगिजांनी माल, घोडे आणि जहाज ही परत केली तर त्याहून अधिक काय हवे." साष्टीहून काही माणसे येथे आली आहेत. त्यांच्याकडून कळले की पोर्तुगिजांनी आपला नोकर सय्यद अबू याजकडे आपले जहाज परत केले आहे. ते आपल्याला मिळाले असेल. काय ते कळवावे, मिळाले असल्यास उत्तम, नाहीतर लवकरच पोर्तुगिजांना शिक्षा करता येईल.

(४१) **याकूतखान यास**- आपले पत्र मिळाले. आपण लिहिता की आपण दर्यापार होऊन राजकोट (चौल) वर हल्ला चढविला. आपल्या सैन्याने शौर्य गाजविले. शत्रूपैकी अनेक ठार झाली आणि अनेक कैद झाली. आणि किल्ल्यातील लोक हवालदील झाले आहेत. आपल्या पत्राने अतिशय आनंद झाला. आपण म्हणता की बादशहाकडून हुकूम येईपर्यंत राजकोटच्या रक्षणासाठी आपण हशमाची व्यवस्था करीत आहात. आणि कुलाबा आणि इतर किल्ले घेण्याचा आपला बेत आहे. ही फार उत्तम गोष्ट आहे. आपण लिहिले आहे की शंकरा नारायण ( शंकराजी नारायण पंतसचिव) हा थोरप किल्ल्याच्या पायथ्याशी आला आहे. परमेश्वर करील तर त्याचा ( शंकराजी नारायण) चांगलाच मोड करण्यात येईल.

(४२) **याकूतखान यास**- मला मन्सबीत पांचशेची बढती मिळाली. माझा मुलगा अबूमुहंमद याला तीनशे जात आणि शंभर स्वार सहामाहीच्या कराराने, अशी मन्सब, खिलतीचा पोशाख, रत्नजडित खंजीर, या गोष्टी मिळाल्या. याबद्दल आपण माझे अभिनंदन केले. आपल्या पत्राने अतिशय आनंद झाला.

अरबी घोड्यासंबंधी मी आपल्याला लिहिले होते. आपण लिहिता की या मोसमात जहाजांची ये जा होत नाही. पण काही माणसे घोडे आणतात आणि पांचबडनेरच्या ठाण्याकडे नेतात. ते घोडे विकत घेण्यापूर्वी त्यांची पारख करून घ्यावी. त्यासाठी आपला एखादा चाबुकस्वार आल्यास बरे. म्हणजे तर आपल्याशिवाय जाणकर असा अश्वपरीक्षक कोण आहे. तर आपणच घोड्यांची निवड करावी. पांच उमदे आणि तरुण असे अरबी घोडे निवडावे. बादशहांना नजर करण्याच्या लायकीचे ते असावे. किंमत आपण ठरवून मला कळवावे म्हणजे मी रक्कम पाठवून देईन. — अपूर्ण














अनुक्रमणिका








डॉ. प. ल. वैद्य

# प्राच्यविद्यांचें अध्ययन व संशोधन : एक समालोचन

[ ' ऑल इण्डिआ ओरिएंटल कान्फरन्स- ' ( अखिल-भारतीय प्राच्यविद्या-परिषदे ) चें पहिलें अधिवेशन पुणें येथें इ. स. १९१९ मध्यें भरलें. या वर्षी अ. भा. प्रा. वि. परिषदेला ५० वर्षें पुरीं होत आहेत. या अवधींत या परिषदेचीं चोवीस अधिवेशनें भरलीं. या वर्षी परिषदेचें पंचविसावें म्हणजे रौप्यमहोत्सवी अधिवेशन कलकत्ता येथें (२९-३०-३१ ऑक्टोबर-१९६९) यादवपूर-विद्यापीठातर्फे नुकतेंच पार पडलें. या रौप्यमहोत्सवी अधिवेशनाचे प्रमुख अध्यक्ष म्हणून प्रख्यात प्राच्यविद्यापंडित व महाभारताचे प्रमुख संपादक डॉ. प. ल. वैद्य यांची निवड गेल्याच वर्षी झाली होती. डॉ. प. ल. वैद्य यांनीं जें अध्यक्षीय भाषण केलें, त्याचा स्वैर अनुवाद प्रस्तुत लेखांत सादर केला आहे.— संपादक ]

इदं कविभ्यः पूर्वेभ्यो नमोवाकं प्रशास्महे ।
विन्देम देवतां वाणीं अमृतामात्मनः कलाम् ॥

अखिल-भारतीय प्राच्यविद्यापरिषदेच्या यंदाच्या रौप्यमहोत्सवी अधिवेशनाचे अध्यक्ष म्हणून मला निवडलें याबद्दल परिषदेच्या कार्यकर्त्यांचा व प्रतिनिधींचा मी अत्यंत आभारी आहे. माझ्यापूर्वी या परिषदेच्या अधिवेशनांचे जे अध्यक्ष होऊन गेले ते प्राच्यविद्यांच्या विविध क्षेत्रांत महान् अधिकारी होते. त्यांच्या तोडीचा मी नाहीं याची मला जाणीव आहे. आतांपर्यंत परिषदेचीं २४ अधिवेशनें झालीं. त्यांपैकीं १८ अधिवेशनांना मी हजर राहिलेला असून परिषदेच्या कार्यकारी मंडळाचा सदस्य म्हणूनहि मी अनेकदां काम केलें आहे. एकदां परिषदेच्या एका विभागाचा मी अध्यक्षहि होतों. आतापर्यंत परिषदेचे प्रमुख अध्यक्ष (General President) होऊन गेले, त्यांच्याशी तुलना करतां माझ्या बाबतीत एक विशेष गोष्ट आहे : ती अशी कीं अखिल भारतीय प्राच्यविद्यापरिषदेचें जें पहिलें अधिवेशन पुण्याला १९१९ सालीं झालें, त्या अधिवेशनाला हजर असणारे व अधिवेशनांतील निबंधचर्चा व व्यवस्था यांत प्रत्यक्ष भाग घेणारे जे कांहीं अगदीं थोडे महाभाग विद्यमान आहेत त्यांपैकी मी एक आहे. प्राच्यविद्यापरिषदेच्या पहिल्या अधिवेशनाचे म्हणजे प्राच्यविद्यापरिषदेचे पहिले सेक्रेटरी माझे अध्यापक प्रा. पां. दा. गुणे हे होते. त्यांनीं मला व माझ्याबरोबर प्रा. चिं. वै. राजवाडे यांना परिषदेपुढें आलेल्या निबंधांचें विषयवार वर्गीकरण करून, त्या निबंधांचे सारांश आर्यभूषण मुद्रणालयांतून छापून घ्यावयाचें काम दिलें होतें. त्याच पहिल्या अधिवेशनाच्या वेळीं पाली व बौद्धधर्म या विभागाचे नियुक्त अध्यक्ष डॉ. सतीशचंद्र विद्याभूषण यांची दृष्टि अधू असल्यामुळें त्यांचें व्याख्यान वाचून दाखवावयाचें काम माझ्याकडे आलें होतें. याचा निर्देश या प्रसंगीं करण्याचें प्रयोजन एवढेंच कीं परिषदेच्या अगदीं पहिल्या अधिवेशनापासून परिषदेच्या कार्यांत भाग घेणारा मी एक कार्यकर्ता सदस्य आहे ही माझी पात्रता लक्षांत घेऊन परिषदेच्या अध्यक्षपदीं माझी नियुक्ति झाली असावी. माझे अध्यापक प्रॉ. सिल्व्हाँ लेव्ही ( Sylvain Levi) हे अ. भा. प्राच्यविद्या-परिषदेच्या कलकत्ता येथें भरलेल्या दुसऱ्या अधिवेशनाचे अध्यक्ष होते. त्यांनीं अध्यक्षांच्या कार्याचें विनोदानें असें वर्णन केलें होतें कीं, अध्यक्षाचें काम म्हणजे आपल्या स्थानीं स्वस्थ बसून, श्रवण करणे हें होय. सिल्व्हाँ लेव्हींचें जें अध्यक्षीय भाषण झालें तें सर्व अध्यक्षीय भाषणांत अत्यंत छोटे असें समजलें जातें. अध्यक्षाचें कार्य व भाषण या बाबतींत लेव्हींचाच आदर्श मला अनुकरणीय वाटतो.

### अखिल-भारतीय प्राच्यविद्यापरिषदेची कल्पना

अ. भा. प्रा. वि. परिषदेला आरंभ कसा झाला हें या प्रसंगीं सांगणें उचित होईल. १९११ सालीं त्या वेळच्या हिंदुस्थानसरकारचे शिक्षणाधिकारी सदस्य







सर हार्कोर्ट बट्लर यांनीं जुलै १९११ मध्यें सिमला येथें कांहीं निवडक प्राच्यविद्यावेत्त्यांची एक सभा भरवली. त्या सभेला उपस्थित असणाऱ्यांमध्यें सर रामकृष्ण गोपाळ भांडारकर व डॉ. जे. व्होगेल हे दोघे होते. ही सभा बोलावण्याचें एक प्रमुख उद्दिष्ट, प्राचीन भारतीय संस्कृति व भारतांतील संस्कृत, अवेस्टा, अरेबिक, पर्शिअन यांसारख्या जुन्या भाषा यांचें अध्ययन-अध्यापन पुनरुज्जीवित करून त्याबरोबरच त्या अध्ययन–अध्यापनाला आधुनिक वळण देणें, हें होतें. याच सभेंत डॉ. व्होगेल यांनीं एक टिपण सादर करून त्यांत मुख्यतः पुढील सूचना केल्या होत्या: (१) युरोपमध्यें इंटरनॅशनल कॉंग्रेस ऑफ ओरिएंटॅलिस्ट्स ही संस्था स्थापन होऊन तिचें पहिलें अधिवेशन पॅरिस येथें १८७३ सालीं झालें; तेव्हांपासून त्या कॉंग्रेसनें प्राच्यविद्याक्षेत्रांत युरोपमध्यें भरीव कार्य करून दाखविलें आहे. युरोपमधील या कॉंग्रेसच्या धर्तीवर हिंदुस्थानसरकारनें प्राच्यविद्या-क्षेत्रांतील निरनिराळ्या भाषातज्ज्ञांच्या व संशोधकांच्या वेळोवेळीं सभा भरविण्याची व्यवस्था करावी. (२) त्याचप्रमाणें सरकारनें दर वर्षी कांहीं तरुण पदवीधर असे भारतीय विद्यार्थी निवडून त्यांना, युरोपमध्यें प्राच्य-विद्यासंशोधनाच्या ज्या आधुनिक शास्त्रीयपद्धती पुरस्कारिल्या जात आहेत त्यांचा अभ्यास करून त्या अंगीं बाणवून घेण्याकरितां पाठवावें. सिमला येथील बैठकींत डॉ. व्होगेल यांची जी पहिली सूचना कीं, भारतीय प्राच्यविद्यावेत्त्यांच्या सभा वेळोवेळीं बोलविण्यांत याव्या ती अमलांत आणली गेली नाहीं. पण दुसरी सूचना मात्र हिंदुस्थानसरकारनें लगेच स्वीकारली व त्या सूचनेनुसार १९११ पासून संस्कृत, अवेस्ता, अरेबिक व पर्शिअन या भाषांच्या अभ्यासक पदवीधरांपैकीं दोघांची निवड करून त्यांना शिष्यवृत्ति देऊन युरोप-मध्ये आधुनिक प्राच्यविद्यासंशोधनपद्धतीचा अभ्यास करण्याकरितां पाठविण्यास सुरवात केली. १९११–१२ मध्यें शिष्यवृत्ति देऊन पहिल्यांदा जे दोन विद्यार्थी निवडले गेले त्यांपैकीं डॉ. पां. दा. गुणे हे एक होते. हिंदुस्थानसरकारचा हा उपक्रम १९२१ पर्यंत चालला. १९२१ मध्ये जे त्यांनीं शेवटचे पदवीधर विद्यार्थी पाठविले त्यांपैकीं मी एक होतों. त्यानंतर हिंदुस्थान-सरकारनें ही योजना बंद केली. तसें करण्याचें कारण हें कीं, शिक्षण हा विषय प्रांतसरकारकडे सोपविला जाऊन, मध्यवर्ती सरकारनें त्यांतील आपलें अंग काढून घेतलें.

## भांडारकर-प्राच्यविद्यामंदिराची स्थापना

डॉ. पां. दा. गुणे जर्मनीमधील आपला अभ्यास संपवून १९१४ सालीं परत आले. याच सुमारास डॉ. श्री. कृ. बेलवलकर हेहि स्वतः आपल्या पैशानें अमेरिकेस जाऊन तेथून अभ्यास संपवून परत आले होते. डॉ. गुणे पुणें येथील फर्ग्युसन कॉलेजमध्यें काम करूं लागले व डॉ. बेलवलकरांची पुणें येथील डेक्कन कॉलेजमध्यें नेमणूक झाली. या दोघांहि प्राध्यापकांना आपण अवगत करून घेतलेली आधुनिक संशोधनपद्धति व ज्ञान तरुण विद्यार्थ्यांपुढें मांडून त्यांनाहि त्यांत तयार करावें अशी मनीषा होती व त्याकरितां त्यांना एखादी संघटना वा संस्था हवी होती. या दोघांच्या जोडीला तिसरे एक पंडित लिंगेश महाभागवत कूर्तकोटी हे मिळाले. ते या सुमारास पुण्याला येऊन राहिले होते. कूर्तकोटी यांचें शिक्षण परंपरागत पंडित-शास्त्र्यां-सारखें झालें होतें. या तीन विद्वानांना पुण्यामध्यें एक प्राच्यविद्यासंशोधनसंस्था स्थापावी अशी कल्पना सुचली. या कल्पनेला मूर्त स्वरूप देण्याच्या दृष्टीनें त्यांनीं पुण्यांतील विद्वानांची एक अनौपचारिक सभा बोलाविली. या सभेनें 'एक प्राच्यविद्यासंशोधनसंस्था स्थापन करावी' हा ठराव मान्य केला व त्याबरोबरच या संशोधनसंस्थेला सर रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांचें नांव द्यावयाचें एकमतानें ठरविलें. भांडारकर यांच्या वयाला ६ जुलै १९१७ रोजीं ८० वें वर्ष संपून ८१ वें लागणार होतें. हा शुभ दिन लक्षांत घेऊन ६ जुलै १९१७ रोजीं भांडारकर ओरिएंटल रिसर्च इन्स्टिट्यूट (भांडारकर-प्राच्य-विद्यामन्दिर) या संस्थेची प्राणप्रतिष्ठा झाली.

## महाभारताची संशोधित आवृत्ति

भांडारकर प्रा. वि. संस्थेनें आपल्या आरंभींच्या बाल्यावस्थेंतच एक मोठी योजना हातीं घेण्याचा संकल्प केला. भारताचें प्राचीन महाकाव्य महाभारत याची संशोधित चिकित्सात्मक आवृत्ति काढावयाची असें त्यांनीं ठरविलें. १९१८ मध्यें पूर्वतयारीची कांहीं जुळवाजुळव केल्यानंतर, १ एप्रिल १९१९ या दिवशीं डॉ. भांडारकरांनीं 'आपल्या शुभ हस्तानें

महाभारतांतील आरंभींचा 'नारायणं नमस्कृत्य' हा पहिला श्लोक तुलनात्मक पाठ–संकलन-पत्रकावर (Collation Sheet वर) लिहिला व अशा रीतीनें औपचारिक रीत्या महाभारताच्या संशोधित आवृत्तीच्या कार्यास आरंभ झाला. महाभारताची शतसाहस्री संहिता संशोधनपूर्वक प्रसिद्ध करण्याच्या या कार्याचा श्रीगणेशा करणाऱ्या भांडारकर प्रा. वि. संस्थेला भाग्यवशात् औंधचे राजे बाळासाहेब पंत प्रतिनिधि यांच्याकडून एक लाख रुपये देणगीचें अभिवचन मिळालें. अर्थात महाभारताच्या संशोधित आवृत्तीचें कार्य एवढें प्रचंड होतें कीं, लवकरच ही राजेसाहेबांची देणगीहि फारच तोटकी पडूं लागली. इतर देणग्याहि मिळूं लागल्या पण फार मंदगतीनें. आरंभींच्या कांहीं वर्षांत तर भांडारकरसंस्थेला महाभारतविषयक कार्याकरितां कर्ज काढावें लागलें. असो. आनंदाची गोष्ट अशी कीं, भांडारकर प्रा. वि. संस्थेनें महाभारताची संशोधित आवृत्ति काढावयाचें जें कार्य योजिलें होतें तें ४८ वर्षांनंतर पूर्ण झालें. पहिले प्रमुख संपादक डॉ. वि. स. सुकथनकर व त्यानंतरचे दुसरे प्रमुख संपादक डॉ. श्री. कृ. बेलवलकर यांच्या नेतृत्वाखालीं अनेक संशोधक विद्वानांनीं केलेल्या परिश्रमानें महाभारताच्या अठरा पर्वांची १३००० पानांची चिकित्सात्मक संशोधित आवृत्ति पूर्ण झाल्याचें २२ सेप्टेंबर १९६६ रोजीं राष्ट्रपति डॉ. एस्. राधाकृष्णन् यांच्या अध्यक्षतेखालीं समारंभपूर्वक जाहीर करण्यांत आलें. महाभारताच्या संशोधित आवृत्तीच्या कार्याचीं उपांगभूत अशीं दोन कार्यें अजून पुरीं व्हावयाचीं आहेत; त्यापैकी एक म्हणजे महाभारतांत खिलपर्व म्हणून गणलें गेलेलें जें 'हरिवंश' त्याची संशोधित आवृत्ति काढणें; हरिवंशविषयक हें कार्यहि पुरें होण्याच्या मार्गावर आहे; त्याचा संशोधित पहिला खंड भांडारकर प्रा. वि. संस्थेच्या सुवर्णमहोत्सवप्रसंगीं राष्ट्रपति डॉ. झाकिर हुसेन यांच्या हस्तें १७ मे १९६७ रोजीं प्रसिद्ध झाला; हरिवंशाचा राहिलेला भाग १९७२ मध्यें पुरा करावयाचें योजिलें आहे; तो मार्च १९७२ मध्येंच पुरा होईल याबद्दल मला संशय नाहीं. महाभारतसंशोधनाचें जें दुसरें उपांगभूत कार्य म्हणजे 'एपिलॉग' (महाभारताचें सर्वांगीण परीक्षण करणारा उपसंहारखंड). त्याला आतां जोरानें हात घालावयाचा समय प्राप्त झाला आहे. गेलीं कांहीं वर्षें, या 'एपिलॉग' बाबत आरंभींच्या पूर्वतयारीचें कार्य चालू आहे.

## अखिल-भारतीय प्राच्यविद्यापरिषद : पहिलें अधिवेशन

भांडारकर प्राच्यविद्यामंदिर ही संस्था जे हेतू व उद्दिष्टें साध्य करण्याकरितां स्थापन झाली, त्यांत देशांतील संशोधक कार्यकर्त्यांना साधनसामग्री व इतर सोयी उपलब्ध करून देणें, संशोधकांमध्यें विचार-विनिमय घडवून आणून त्यांच्या संशोधनकार्यांत सुसूत्रता आणणें आणि तरुण संशोधकांच्या अंगीं आधुनिक शास्त्रीय संशोधनपद्धति बाणविणें या उद्दिष्टांचा अंतर्भाव आहे. त्यांतील एक उद्दिष्ट म्हणजे संशोधकांमध्ये विचारविनिमय घडवून आणून त्यांच्या कार्यांत सुसूत्रता आणणें– हें साध्य करण्याकरितां भांडारकर– प्रा. वि. संस्थेनें, डॉ. व्होगेल यांनीं १९११ च्या सिमला येथील सभेंत केलेल्या सूचनेनुसार, 'इंटरनॅशनल कॉंग्रेस ऑफ ओरिएंटॅलिस्ट्स', या संस्थेच्या धर्तीवर प्राच्यविद्याविदांचीं वेळोवेळीं सभा-संमेलनें घडवून आणावींत असा संकल्प केला. त्या संकल्पानुसार, संस्थेच्या कार्यकारी मंडळाने १२ डिसेंबर १९१८ रोजी असा ठराव केला कीं हिंदुस्थानांतील प्राच्यविद्याविदांची परिषद् भरविणें अत्यंत इष्ट व आवश्यक असून अशी परिषद् १९१९ या वर्षांत शक्य तर पुणें येथें भरवावी. या ठरावानुसार परिषद् भरविण्याचा आपला मनोदय प्राच्यविद्याविदांना एक परिपत्रक पाठवून कळविला. परिषद् भरविण्यासंबंधीच्या कल्पनेचें शासनसंस्था, विद्यापीठें, संशोधन-संस्था आणि संशोधक व्यक्ती यांच्याकडून तत्काल उत्स्फूर्त स्वागत झालें. प्राच्यविद्या-परिषद् पुणें येथें भरवावयाचें ठरलें. १९१९ मे मध्यें ही परिषद् बोलवावी असे पहिल्यांदा ठरलें होतें. पण हिंदुस्थानांतील ठिकठिकाणच्या संशोधक पंडितांच्या सोयीकरितां, ही तारीख बदलून परिषद् ५–६–७ नोव्हेंबर १९१९ या दिवशीं बोलवावयाचें ठरलें. त्याप्रमाणें प्राच्यविद्यापरिषदेचें पहिलें अधिवेशन पुणें येथें भांडारकर प्रा. वि. संस्थेच्या आवारांतच भरविण्यांत आलें. सर रामकृष्ण








गोपाळ भांडारकर त्या वेळीं ८२ वर्षांचे होते. त्यांची पहिले प्रमुख अध्यक्ष म्हणून निवड झाली. परिषदेच्या या पहिल्या अधिवेशनाला ३०० वर प्रतिनिधि व संशोधक आले होते. या परिषदेचे पहिले सेक्रेटरी डॉ. पां. दा. गुणे, प्रा. एन्. बी. उटगीकर व प्रा. र. दा. करमरकर असे तिघेजण होते. परिषदेच्या पहिल्याच अधिवेशनात, परिषदेच्या कार्यांत कोणत्या गोष्टी अंतर्भूत असाव्यात, त्या कार्याचें स्वरूप काय असावें, व तें कार्य कसें चालवावें— या गोष्टींचा एक निश्चित सांचा किंवा नमुना आंखणें आवश्यक होतें. संतोषाची गोष्ट अशी कीं, पहिल्या अधिवेशनांत जो परिषदेच्या कार्यपद्धतीचा सांचा ठरला तोच, थोडे किरकोळ फरक करून, परिषदेच्या पुढील अधिवेशनांतून अंमलांत आला. परिषदेच्या पहिल्या अधिवेशनांत जी. कार्यपद्धति अवलंबिली गेली तीच पुढेंहि चालू राहिली. ती कार्यपद्धति अशी : पहिल्यांदा स्वागताध्यक्षांचें भाषण, नंतर प्रमुख अध्यक्षांचें भाषण. त्यानंतर, परिषदेच्या अधिवेशनाचे विषयवार विभाग पाडले जातात. पहिल्या अधिवेशनांत असे विभाग १२ होते. आतां अलीकडे हे विभाग १६ पर्यंत गेले आहेत. प्रत्येक विभागाचा त्या त्या विषयांतील तज्ज्ञ असा एक अध्यक्ष निवडला जाऊन, त्याच्या अध्यक्षीय भाषणांत त्या विशिष्ट विभागान्तर्गत विषयांत वा ज्ञानशाखेंत कोणत्या प्रकारचें नवीन संशोधन झालें याचें विहंगमावलोकन होतें. अध्यक्षीय भाषणानंतर, त्या विभागातील विषयावर आलेले निबंध वाचले जाऊन त्यावर चर्चा होते. संशोधकांचे निबंध त्यांच्या सारांशासह आधींच परिषदेकडे अधिवेशनापूर्वीं आलेले असतात. चर्चा करण्यास सुलभ जावें म्हणून या निबंधांचे सारांश आधीच छापले जाऊन त्यांच्या प्रती प्रतिनिधींना व सदस्यांना मिळतात. प्राच्यविद्यापरिषदेच्या अधिवेशनाला जोडून एक पंडितपरिषद्हि भरविली जाते व त्यांतील निबंध व चर्चा संस्कृतमध्येंच असतात. पहिल्या अधिवेशनाच्या वेळींच पण्डितपरिषदेच्या अधिवेशनाचा उपक्रम सुरू झाला. अधिवेशनाच्या शेवटच्या बैठकींत झालेल्या कार्याचें सिंहावलोकन होतें व ठराव पास होतात.

## परिषदेचे हेतू व उद्दिष्टें

प्राच्यविद्यापरिषदेच्या मंडळांतून पहिलीं कांहीं वर्षें निवडणुकी होत नसत; कारण परिषदेचे रीतसर घटनानियम तयार झाले नव्हते. प रि ष दे च्या पहिल्याच अधिवेशनांत परिषदेची घटना ठरविण्याकरितां एक समिति नेमली गेली. ए. सी. वुल्नर, सतीशचंद्र विद्याभूषण, कुप्पुस्वामी शास्त्रीं आणि एम्. हिरिअण्णा हे विद्वान् त्या समितीचे सदस्य होते. परिषदेचे हेतु व उद्दिष्टें यासंबंधीं संशोधक प्रतिनिधि व सदस्य यांच्याकडून ज्या सूचना आल्या होत्या, त्या विचाराकरतां याच समितीकडे सोपविल्या गेल्या. त्या अमलांत आणण्याची कार्यपद्धति काय असावी याचाहि विचार करण्याचें काम या समितीकडेच सोपविलें गेलें. आलेल्या सूचनांपैकीं कांहीं महत्त्वाच्या अशा होत्या : देशांत ठिकठिकाणीं असलेलीं संस्कृत हस्तलिखितें गोळा करून त्यांचें नीट जतन करणें; एक मध्यवर्ती अखिल भारतीय संशोधनसंस्था स्थापणें; ज्यांचें संशोधन व प्रकाशन एकट्या-दुकट्या व्यक्तीकडून होणें शक्य नाहीं,— उदाहरणार्थ, प्राचीन भारतीय ग्रंथांच्या संशोधित आवृत्ती, निरनिराळ्या प्रकारचे ज्ञानकोश, त्या त्या ज्ञानशाखेंतील पारिभाषिक शब्दांचे कोश— अशा ग्रंथांबाबत अनेक विद्वानांचें सामुदायिक सहकार्य मिळवून ते ग्रंथ तयार करवून प्रसिद्ध करणें; आणि प्राचीन पंडितपरंपरेला अनुसरून चालू असलेल्या शास्त्रांच्या अध्ययन—अध्यापन कार्याला उत्तेजन देणें.

## प्राच्यविद्याक्षेत्रांतील कांहीं महत्त्वाचीं कार्यें

वरील वर्णनावरून, प्राच्यविद्यापरिषदेनें पुढील काळांत कोणती उद्दिष्टें साध्य करण्यावर आपलें लक्ष केंद्रित करावें याचें दिग्दर्शन पहिल्या अधिवेशनातच झालें होतें, हें दिसून येईल. गेल्या पन्नास वर्षांत वरील उद्दिष्टें साध्य करण्याच्या दिशेनें पुष्कळच कार्य झालें आहे. पुणें, मद्रास, तंजावर, त्रिवेंद्रम्, वाराणशी, बडोदें, कलकत्ता, जोधपूर, जयपूर या ठिकाणीं हस्तलिखितसंग्रहालयें अस्तित्वांत आलीं आहेत; जीं हस्तलिखितें हिंदुस्थानांत उपलब्ध नाहींत, जीं हिंदुस्थानाबाहेर जाऊन युरोप-अमेरिका या देशांतील संग्रहालयांतून आहेत, त्यांच्या हस्तलिखित नकला, फोटो, मायक्रोफिल्म आज संशोधकांना उपलब्ध होत आहेत.










राहुल सांकृत्यायनांसारख्या पंडितांनीं तर तिबेटमधून पुष्कळ हस्तलिखितें आणलीं आहेत. संशोधकांना घरबसल्या हस्तलिखितसंग्रहालयांतून हस्तलिखितें तीं परत करण्याच्या करारानें मिळत आहेत. जीं हस्तलिखितें भारतांत व भारताबाहेरील देशांत संग्रहालयांतून आहेत, त्यांची सविस्तर माहिती उपलब्ध करून देण्याच्या बाबतींत डॉ. राघवन् यांनी ' न्यू कॅटलॉगस कॅटॅलॅगोरम ' हा अनेक– खंडात्मक ग्रंथ हातीं घेऊन जें कार्य चालविलें आहे तें अत्यंत प्रशंसनीय आहे. या ' कॅटलॉग ' करितां डॉ. राघवन् यांनी केवळ हिंदुस्थानांतील संग्रहालयेंच नव्हेत तर हिंदुस्थानाबाहेरील इतर देशांतील संग्रहालयेंहि धुंडाळलीं आहेत. या ' कॅटलॉग'चे चार खंड आतांपर्यंत बाहेर पडले आहेत. लवकरच बाकीचे खंड प्रसिद्ध होऊन कॅटलॉगचें कार्य पूर्ण होईल. हस्तलिखितांचा शोध करून तीं जमा करण्याचें कार्य अजूनहि व्हायला पाहिजे. देशांत ठिकठिकाणीं अनेक सनातनी शास्त्री-पंडितांजवळ हस्तलिखितें असतात. पण तीं संशोधकाला दाखवायला देखील ते तयार नसतात. मिनायेफ नांवाच्या एका रशियन पंडितानें कित्येक गाड्या भरतील एवढे हस्तलिखितांचे भारे हिंदुस्थानांतून रशियांत नेले असें महामहोपाध्याय पंडित हरप्रसादशास्त्री यांनीं आपल्या अध्यक्षीय भाषणांत म्हटलें आहे. माझ्या माहितीप्रमाणें मिनायेफनें नेलेलीं हस्तलिखितें लेनिनग्राडच्या संग्रहालयांतून जतन करून ठेविलीं आहेत. आपल्या भारतसरकारचा, परदेशाशीं सांस्कृतिक देवाण-घेवाण करण्याच्या दृष्टीनें ( Cultural Exchange Missions ) शिष्टमंडळें परदेशीं पाठविण्याचा कार्यक्रम असतो. त्या कार्यक्रमानुसार, भारतांतील प्राच्यविद्यापंडितांचें एक मंडळ रशियाला पाठवून, लेनिनग्राड–संग्रहालयांतील हस्तलिखितांची तपशीलवार माहिती व त्या हस्तलिखितांच्या मायक्रोफिल्म येथील संशोधकांना उपलब्ध करून देणें भारतसरकारला कठिण नाहीं. भारतांतीलहि कांहीं संग्रहालयें अशीं आहेत कीं, जीं हस्तलिखितें बाहेर उसनीं वापरायला देत नाहींत किंवा त्यांच्या नकला वा मायक्रोफिल्म करून पाठविण्याचीहि व्यवस्था त्यांच्याकडे नाहीं. या परिस्थितींत सुधारणा होणें आवश्यक असून संशोधकांना हस्तलिखितें उपलब्ध झालीं पाहिजेत.

ज्ञानकोश व शब्दकोश तयार करून ते प्रकाशित करणें या कार्याचा विचार करतां या क्षेत्रांतहि कांहीं भरीव कार्य झालें आहे असें दिसतें. पुण्याचे डॉ. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव यांनीं प्रसिद्ध केलेले तीन चरित्रकोश– प्राचीन, मध्ययुगीन, व अर्वाचीन– विशेष उल्लेखनीय आहेत. हे चरित्रकोश आरंभी मराठींतून प्रसिद्ध झाले. अलीकडे त्यांपैकीं कांहीं हिंदीमध्यें प्रसिद्ध झाले आहेत. डॉ. चित्राव ' भौगोलिक स्थलनामकोश'हि तयार करीत असून तो लवकरच प्रकाशित होईल. भौगोलिक स्थल-नामकोशाच्या संदर्भात, डॉ. पां. वा. काणे यांनीं आपल्या ' हिस्टरी ऑफ धर्मशास्त्र ' या ग्रंथाच्या चौथ्या खंडांत ' ए लिस्ट ऑफ तीर्थाज् ' या साध्या नांवाखालीं जी भौगोलिक दृष्ट्या तीर्थांची माहिती दिली आहे ती भौगोलिक संशोधनदृष्ट्या महत्त्वाची म्हणून उल्लेखनीय आहे. वाईच्या प्राज्ञपाठशाळा-मंडळानें अनेक- खंडात्मक धर्मकोश तयार करून प्रसिद्ध केला आहे. वैदिक-कर्मकांडविषयक श्रौतकोश तयार करून तो प्रसिद्ध करण्याचें कार्य पुण्याचें वैदिक-संशोधनमंडळ करीत आहे. नाट्य व साहित्यशास्त्र या ज्ञानशाखेंतील पारिभाषिक शब्दांचा कोश तयार करण्याचें कार्य म्हैसूर येथील ओरिएंटल इन्स्टिट्यूटनें आपल्या अंगावर घेतलें आहे. अहमदाबाद येथील लालभाई दलपतभाई प्राच्यविद्यासंस्थे- ( इन्स्टिट्यूट ऑफ इंडालजी ) नें जैन तत्त्वज्ञानांतील पारिभाषिक शब्दांचा कोश तयार केला असून तो प्रकाशनाच्या मार्गावर आहे. ऐतिहासिक तत्त्वावर आधारलेल्या संस्कृत शब्दकोशाचें प्रचंड कार्य पुण्याच्या डेक्कन कॉलेज रिसर्च इन्स्टिट्यूटनें पत्करलें असून, त्याची समाधानकारक प्रगति होत आहे. ' वैदिक-पदानुक्रमणी' हा कोश डॉ. विश्वबंधु शास्त्री यांनीं प्रसिद्ध करून महत्त्वाची कामगिरी केली आहे. अहमदाबादच्या प्राकृत टेक्स्ट सोसायटीनें ' पैय-सद्-महण्णव ' या ग्रंथाची दुसरी सुधारलेली आवृत्ति नुकतीच प्रसिद्ध केली आहे. ट्रेंकनर-अँडर्सन-स्मिथ यांनीं आरंभिलेला ' क्रिटिकल पालि डिक्शनरी ' हा पालि शब्दकोश तयार करण्याचें काम गेलीं ७८ वर्षें रेंगाळत आहे; तें कार्य हाम्बुर्गचे डॉ. आल्सडॉर्फ यांच्या प्रमुख संपादकत्वाखालीं नवीन जोमानें चालू झालें आहे. पालि शब्दकोशाचें कार्य लवकर पूर्ण व्हावें या दृष्टीनें डॉ.








आल्सडॉर्फ यांनी शब्दकोशाचे विभाग पाडले असून ते विभाग तयार करण्याचें काम निरनिराळ्या ठिकाणीं वाटून दिलें आहे. कलकत्ता हेंहि अशा केन्द्रांत समाविष्ट आहे.

प्राचीन भारतीय महाकाव्यें– पुण्याला महाभारत व बडोद्याला रामायण-यांच्या चिकित्सापूर्वक संशोधित आवृत्त्यांचें कार्य पुरें होत आलें आहे. पुराणांच्या चिकित्सापूर्वक संशोधित आवृत्त्या तयार व प्रसिद्ध करण्याचें कार्य, वाराणशी येथील काशीराज ट्रस्टनें चालविलें असून त्यांच्यातर्फे, प्राच्यविद्यापरिषदेच्या गेल्यावर्षी वाराणशी येथें भरलेल्या अधिवेशनाच्या प्रसंगीं, वामनपुराणाची संशोधित आवृत्ति प्रसिद्ध झाली. वामनपुराणाच्या या संशोधित आवृत्तीबरोबर, त्या आवृत्तीच्या आधारें केलेले हिन्दी व इंग्रजी अनुवादहि दोन स्वतंत्र खंडांतून प्रसिद्ध झाले आहेत. नालंदा येथून देवनागरी लिपीमध्यें पालि त्रिपिटकाची समग्र आवृत्ति कांहीं वर्षांपूर्वी प्रसिद्ध झाली असून, या आवृत्तीमुळें भारतीय संशोधकांना एक नवीन क्षेत्र उपलब्ध झालें आहे. भारत–सरकार व बिहार–सरकार यांनीं संयुक्तपणें आर्थिक जबाबदारी स्वीकारल्यामुळें, महायान बौद्धधर्माचे देवनागरी लिपीमध्यें छापलेले प्रमुख ग्रंथ आज संशोधकांस उपलब्ध झाले आहेत. जैनांच्या श्वेतांबरपंथांतील आगमग्रंथांपैकीं कांहीं थोडेच संशोधित स्वरूपांत प्रसिद्ध झाले आहेत; श्वेतांबरपंथीय समग्र आगमग्रंथ संशोधित आवृत्तींच्या रूपानें प्रकाशित होणें इष्ट व आवश्यक आहे. जैनांच्या दिगंबरपंथाच्या आगमग्रंथांपैकीं, षट्खंडागमांचे प्रचंड ग्रंथ आणि धवला, जयधवला, आणि महाधवला या टीकाहि प्रसिद्ध झाल्या आहेत.

प्राचीन भारतीय संस्कृतीच्या विविधशाखांवर संशोधनपूर्वक प्रबंध व ग्रंथ तयार करून ते प्रकाशित करणें हें प्राच्यविद्यापरिषदेच्या कार्यक्रमांत पहिल्यापासून समाविष्ट होतें. अशा प्रकारच्या तयार झालेल्या ग्रंथांत महामहोपाध्याय डॉ. पां. वा. काणे यांचा 'हिस्टरी ऑफ धर्मशास्त्र' हा ३५०० पृष्ठांपेक्षां जास्ती असलेला पंचखंडात्मक ग्रंथ अग्रगण्य म्हणून उल्लेखनीय आहे. या ग्रंथाच्या बाबतींत विशेष गोष्ट म्हणजे हा सबंध ग्रंथ केवळ एका व्यक्तीनें एकहातीं लिहून आपलें जीवितकार्य समजून पूर्ण केला आहे. धर्मशास्त्रातील विविध विषयावरील हा ग्रंथ म्हणजे ज्ञानार्णव असून, धर्मशास्त्रावरील विश्वकोशाच्या स्वरूपाचा आहे, यांत संशय नाहीं. ग्रंथांतील एक १०४ पानांचा 'तीर्थक्षेत्रावर' जो विभाग आहे, त्यांतील अंतरंगावर कोणीहि जाणत्यानें ओझरती जरी नजर टाकली तर ग्रंथकर्त्याची गाढ विद्वत्ता, अमाप परिश्रम आणि विषयाची सुबद्ध मांडणी या गुणांचा त्याला प्रत्यय आल्यावाचून रहाणार नाहीं. आपल्या धर्मशास्त्राच्या इतिहासाकरितां काणे यांनीं धर्मशास्त्रावरील केवळ प्रकाशित ग्रंथच नव्हे तर अप्रकाशित असें हस्तलिखितांच्या रूपानें असलेलें वाङ्मयसुद्धा पालथें घातलें आहे.

## व्याकरण व अर्थशास्त्र

सर रामकृष्ण भांडारकर यांनीं प्राच्यविद्यापरिषदेच्या पहिल्या अधिवेशन-प्रसंगीं केलेल्या अध्यक्षीय भाषणांत पतंजलीचें महाभाष्य व कौटिल्याचें अर्थशास्त्र यांचा कसून संपूर्ण अभ्यास व संशोधन झालें पाहिजे असें आवर्जून सांगितलें होतें. पूर्वीं महाभाष्याचा अभ्यास परंपरागत शास्त्री–पंडित करीत तो केवळ महाभाष्याच्या कांही भागांचा. शिवाय महाभाष्याचा अभ्यास करतांना त्या शास्त्रीपंडितांची दृष्टि केवळ व्याकरणापुरती असे; महाभाष्यांत भारतीय संस्कृतीच्या विविध अंगांबद्दल त्यांत जी खचून माहिती भरलेली आढळते तिच्याकडे त्यांचें लक्ष नसे. अलीकडील काळांत महाभाष्याचें मराठी भाषांतर महामहोपाध्याय वासुदेवशास्त्री अभ्यंकर यांनीं केलेलें प्रसिद्ध झालें असून, त्याला त्यांचे चिरंजीव प्रो. का. वा. अभ्यंकर यांनीं उद्बोधक प्रस्तावनाहि जोडली आहे. पुणें विद्यापीठांतील 'सेंटर ऑफ ॲडव्हान्सड स्टडी इन संस्कृत' या संस्कृत-अध्ययन-केन्द्रानें महाभाष्याचें टिप्पणासह इंग्रजी भाषांतर प्रसिद्ध करण्याचें योजिलें आहे. आतांपर्यंत एकच अधिकरण 'समर्थाधिकरण' नांवाचें प्रसिद्ध झालें आहे. कांहीं वर्षांपूर्वी एका दक्षिण हिंदुस्थानांतील पंडितानें महाभाष्याचें भाषांतर करून तें प्रसिद्ध करण्यास सुरुवातहि केली होती. परंतु द्रव्याभावीं तें काम बंद पडलें. अलीकडील कांहीं वर्षांतून पाणिनि व पतंजलि यांच्या ग्रंथांचें सांस्कृतिकदृष्ट्या अध्ययन










करण्याचा उपक्रम विद्वानांनीं केला आहे. अशा अध्ययनाचीं उदाहरणें म्हणून डॉ. वासुदेवशरण अग्रवाल यांचा 'इंडिआ अॅज नोन टु पाणिनी' ( इंग्रजी व हिंदी आवृत्ति ), डॉ. बी. एन्. पुरी यांचा ( इंडिआ इन दी टाइम ऑफ पतंजलि' व डॉ. पी. डी. अग्निहोत्री यांचा हिंदींतील 'पतञ्जलिकालीन भारत' या ग्रंथांचा निर्देश करतां येईल. संस्कृत व्याकरणाच्या क्षेत्रांत भाष्यें व टीका यांच्या रूपानें कांहीं नवीन ग्रंथ प्रकाशित झाले आहेत : अशा प्रकारचा भर्तृहरीचा 'दीपिका' हा ग्रंथ डॉ. स्वामिनाथन् यांनीं ( चार आह्निकांपुरता ) व प्रा. का. वा. अभ्यंकर व आचार्य वि. प्र. लिमये यांनीं संशोधनपूर्वक प्रसिद्ध केला आहे. अलीकडे भर्तृहरीच्या 'वाक्यपदीया' नेंहि विद्वानांचें लक्ष वेधलें असून प्रा. के. ए. एस्. अय्यर यांनीं तयार केलेली त्याची संशोधित आवृत्ति पुण्याच्या डेक्कन कॉलेज इन्स्टिट्यूटतर्फे प्रसिद्ध होत आहे. कौटिल्याचें अर्थशास्त्र १९०९ मध्यें विद्वानांपुढें आलें. तेव्हांपासून त्या ग्रंथाच्या अनेक आवृत्त्या व त्या ग्रंथाचें अंतरंग-परीक्षण करणारे अनेक निबंध-प्रबंध-ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत. 'अर्थशास्त्रा'चा अभ्यास करुन संशोधनपूर्वक तयार केलेला अगदीं अलीकडील ग्रंथ म्हणजे प्रा. आर. पी. कंगले यांचा होय.

## युरोप-अमेरिकेमधील प्राच्यविद्याविषयक कार्याशी संपर्क

अखिल भारतीय प्राच्यविद्यापरिषदेचें दुसरें अधिवेशन कलकत्ताविद्यापीठातर्फे कलकत्ता येथें भरलें. त्या वेळेला (१९२२-२३) फ्रेंच प्राच्यविद्यापंडित सील्व्हाँ लेव्ही हे हिंदुस्थानांत आले होते. तेच या अधिवेशनाचे प्रमुख अध्यक्ष होते. परिषदेच्या अधिवेशनांत परिषदेचे हेतु व उद्दिष्टें काय असावींत याबद्दल ऊहापोह झाला. त्यापैकीं एक उद्दिष्ट असें कीं, युरोप व अमेरिका या देशांतून प्राच्यविद्यांच्या क्षेत्रांत जें कांहीं अध्ययन-संशोधन चालू असेल त्याची अद्ययावत् माहिती प्राच्यविद्यापरिषदेनें मिळविण्याची व्यवस्था करावी. त्याचप्रमाणें संस्कृत व संस्कृतसंबद्ध भाषा यांचें हिंदुस्थानांतील विद्यापीठें, महाविद्यालयें व परंपरागत शिक्षण देणाऱ्या पाठशाळा यामधून चालू असलेलें अध्ययन-अध्यापन व त्यांतील प्रगति याचाहि मागोवा घेणें हेंहि एक प्राच्यविद्यापरिषदेचें उद्दिष्ट सर्वमान्य झालें. कलकत्याच्या अधिवेशनांत ज्या या उद्दिष्टांचा ऊहापोह झाला त्या उद्दिष्टांनुसार, परिषदेनें कार्य करण्याचा आतांपर्यंत प्रयत्न केला आहे. सुमारें ५० वर्षांपूर्वी तरुण अभ्यासू संशोधक पदवीधर विद्यार्थ्यांना युरोप-अमेरिकेमध्यें जायला मिळत नसे. स्वतः खर्च करुन जाणें परवडत नसे. त्यावेळचें हिंदुस्थान सरकारहि अशा तरुण संशोधकांना परदेशी अभ्यासाकरितां जाण्यास प्रोत्साहन देत नसे; उलट, अशा कांहीं जाणाऱ्या संशोधकांकडे संशयी दृष्टीनें पहात असे. माझा स्वतःचा अनुभव असा आहे कीं, १९२१ ऑक्टोबरमध्यें मी युरोपमध्यें असतांना प्रसिद्ध रशियन पंडित श्चेरबास्की ( Scherbatski ) याची लंडनला भेट घेण्याला मला किती अडचणी सोसाव्या लागल्या! १९२१ नंतर तर हिंदुस्थान सरकारनें परदेशांत अभ्यास करण्याकरितां जाणाऱ्या विद्यार्थ्यांकरितां सुरू केलेली शिष्यवृत्ति बंदच केली. म्हणून भारतीय संशोधक-पंडितांना परदेशीं जाऊन तेथील विद्वानांशीं संपर्क साधणें व तेथील संशोधनांत काय प्रगति झाली आहे याचा परिचय करून घेणें शक्य होत नसे. युरोपमधील प्राच्यविद्याविशारदांच्या आंतरराष्ट्रीय परिषदेचें अधिवेशन दर तीन-चार वर्षांनीं भरत असे. १९३१ सालीं लेडन ( हॉलंड ) येथें या आंतरराष्ट्रीय परिषदेचें १८ वें अधिवेशन भरलें होतें. त्या अधिवेशनाला डॉ. सुकथनकर व मी स्वतःच्या खर्चानें गेलों होतों. याच अधिवेशनाला आणखी तीन भारतीय विद्वान् वाराणशीचे डॉ. प्राणनाथ, मुंबईचे आर. पी. मसानी, आणि लाहोरचे डॉ. रघुवीर– हे हजर होते. हे तिघे इतर कामांच्या निमित्तानें युरोपला गेले होते म्हणून त्यांना लेडनच्या अधिवेशनाला हजर रहातां आलें. जेनेव्हा येथे भाषाशास्त्रज्ञांची आंतरराष्ट्रीय परिषद् १९३१ च्या ऑगस्टमध्यें भरली होती, तिला मी भारतीय असा एकटाच हजर होतों. —अलीकडे स्वातंत्र्यप्राप्तीनंतर परिस्थिति खूप बदलली असून, अनेक विद्वानांना परदेशीं जाऊन तेथील सभा-संमेलनांतून प्रत्यक्ष भाग घेतां येणें शक्य झालें आहे. हिंदुस्थान सरकारचे प्रतिनिधि म्हणून पुष्कळ प्राच्यविद्याविशारद अलीकडे








परदेशीं जाऊं शकतात, व आंतरराष्ट्रीय परिषदांनीं नियुक्त केलेल्या समितींवरहि काम करूं शकतात. त्याचप्रमाणें युरोप-व-अमेरिकेमधील विद्वान्‌हि भारतांतील प्राचीन व अर्वाचीन भाषा, त्यातील साहित्य व सांस्कृतिक ज्ञान यांचा अभ्यास करण्याकरितां येथें येऊन येथील परिस्थितीचा प्रत्यक्ष परिचय करून घेऊं शकतात. या बाबतींत मला एवढें सुचवावेंसें वाटतें कीं भारतसरकारनें या बाबतींत अधिक उदार धोरण स्वीकारलें पाहिजे, व भारताच्या परदेशीं ज्या वकीलाती आहेत, त्यांतून भारतीय व इतर संस्कृतींचा अभ्यास करणाऱ्या तज्ज्ञ संशोधक विद्वानांच्या नेमणुका केल्या पाहिजेत. हल्लीं परदेशाशीं सांस्कृतिक विनिमय ( Cultural Exchange ) साधण्याकरितां सरकारतर्फे अनेक शिष्टमंडळें जात असतात. त्या शिष्टमंडळाची कक्षा केवळ तज्ज्ञ गायक व नर्तक यांच्या पुरतीच मर्यादित न ठेवतां, त्या शिष्टमंडळांतून भारतीय व इतर संस्कृती यांचा अभ्यास करणाऱ्या तज्ज्ञ विद्वानांचाही समावेश व्हावयास पाहिजे.

सील्व्हाँ लेव्ही यांनीं अखिल-भारतीय प्राच्यविद्या-परिषदेच्या दुसऱ्या अधिवेशनामध्यें आपल्या अत्यंत छोट्या अध्यक्षीय भाषणात भारतीय संस्कृतीच्या प्रसारा-बाबतीत एक विशेष गोष्ट निदर्शनाला आणली होती : भारतीय संस्कृतीचा प्रसार केवळ भारताच्या भौगोलिक व राजकीय सीमांच्या परिसरांतच झाला नव्हता, तर तो भारताच्या बाहेर– उत्तर, दक्षिण, पूर्व व पश्चिम या दिशांकडील देशोदेशीं कांहीं काळ खोलवर पोहोंचला होता; अर्थात् कांहीं काळानंतर भारताच्या बाहेर असलेल्या त्या देशांतून इतर संस्कृती पुढें सरसावल्या. त्यामुळें भारतीय संस्कृति मागें पडली असली तरी तिच्या ठश्याचे अवशेष तेथील संस्कृतीमधून अजूनहि दिसून येतात; म्हणून भारताबाहेरील या नजीकच्या देशांतून भारतीय संस्कृतीच्या अवशिष्ट ठश्यांचें संशोधन व मूल्यमापन होणें अगत्याचें आहे. त्याप्रमाणें अशा प्रकारचें नजीकच्या परदेशांतील भारतीय संस्कृतीचें संशोधन करण्याकरितां पेलिअट ( Pelliot ) मिशन व स्टाइन ( Stein ) मिशन अशासारखीं विद्वानांची मंडळें त्या त्या देशांतून संशोधनाकरितां गेली होतीं. परंतु भारतीय पंडितांना तशा प्रकारचें काम करण्यास वाव मिळाला नव्हता. अगदीं अलीकडे भारतीय संशोधकांनीं या क्षेत्रांत प्रवेश केला असून तेहि महत्त्वाचें संशोधन करीत आहेत.

### संस्कृत वाङ्मयांत अ-वैदिकांनीं टाकलेली भर

आपल्या परंपरागत वैदिक व संस्कृत शास्त्राध्ययनांच्या परंपरा लुप्त होण्याच्या मार्गावर आहेत. परंपरागत संस्कृत अध्ययन केलेले पंडित–शास्त्री तुरळकच आढळून येतात व त्यांच्याबद्दल समाजांतील कांहीं लोकांना अत्यादर वाटतो हें खरें. परंतु सर्वसाधारण माणसांची अशा तऱ्हेच्या परंपरागत अध्ययनाच्या मूल्यांवरील श्रद्धा ढळली आहे, ही दुर्दैवाची गोष्ट आहे. अर्थात् माझा असा आग्रह नाहीं कीं प्रत्येकानें जटिल अशा प्राचीन दर्शनशास्त्रांचें अध्ययन करून पंडित बनावें व शास्त्रार्थचर्चेत नैपुण्य संपादावें. परंतु मला आवर्जून सांगावेसें वाटतें कीं प्रत्येक नागरिकाला आपल्या प्राचीन भाषेचें व त्या भाषेंतील वाङ्मयांत निविष्ट असलेल्या संस्कृतीचें साधारणपणें स्थूल ज्ञान तरी असलेंच पाहिजे. संस्कृतच्या अध्ययनाचा पाया विशाल व व्यापक असावा; एका जातीपुरतें वा जमातीपुरतें तें मर्यादित राहूं नये. ब्राह्मणांनींच संस्कृतचा अभ्यास केला पाहिजे असा दावा हिंदुधर्मीयांनी करूं नये. प्राचीन इतिहासांत असें आपणांस आढळून येतें कीं, भारतांतील इतर अवैदिक समजल्या गेलेल्या धर्मांच्या व दर्शनांच्या अनुयायांनी आपल्या विचाराचें माध्यम म्हणून संस्कृतचा अवलंब करून संस्कृतमध्यें ग्रंथरचना केलेली आहे. बौद्धांनीं व जैनांनी संस्कृत ग्रंथरचना करून जी संस्कृत वाङ्मयांत भर टाकली आहे, ती कांही थोडी नाहीं. मुसलमानांनींहि संस्कृतचा अभ्यास करून संस्कृत ग्रंथरचना करून संस्कृत वाङ्मयांत भर टाकल्याचीं कांहीं उदाहरणें आहेत. जैनधर्मीयांनीं आपले आधींचे धार्मिक ग्रंथ प्राकृतमध्यें रचले. परंतु नंतर त्यांनीं आपल्या ग्रंथरचनेकरितां संस्कृत ही भाषा स्वीकारिली, कारण त्यांना असे वाटलें कीं संस्कृतमध्यें ग्रंथ असल्यास त्यांतील धर्मतत्त्वें अधिक लोकांना विदित होतील. सीलोनमधील व आग्नेय आशियांतील इतर देशांतील बौद्धांनीं आपले धार्मिक ग्रंथ पालीमध्यें रचले. परंतु हिंदुस्थानांत सुमारें १० व्या शतकापर्यंत उत्कर्ष पावलेल्या महायान-पंथीय बौद्धांनीं आपले धार्मिक व तत्त्वज्ञानात्मक ग्रंथ संस्कृत-मध्यें लिहिले. महायानपंथीयांचें बरेचसें वाङ्मय केवळ







वेड्या धर्मांध असहिष्णुतेमुळें भारतांतून नष्ट झालें. तिबेटी व चिनी भाषेंत जे महायानपंथीय ग्रंथ त्या भाषेंतील लिपींत लिहिलेले किंवा त्या भाषांतून अनुवादिलेले आज अवशिष्ट असलेले आढळून येतात, त्यांवरून त्यांचे मूळ संस्कृत ग्रंथ नष्ट झाल्यामुळें संस्कृत वाङ्मयाची केवढी अपरिमित हानी झाली आहे याची आपणांस कल्पना येते. संस्कृत भाषा व तीमधील वाङ्मय याचें सामग्र्यानें मूल्यमापन करावयाचें असेल तर जैन आणि बौद्ध ग्रंथकारांनीं संस्कृतमध्यें ग्रंथरचना करून जी संस्कृत वाङ्मयांत भर घातली आहे तीहि आपण विचारांत घेतली पाहिजे. संस्कृत वाङ्मय म्हणजे केवळ वेद, षड्दर्शनें, व्याकरण, महाभारत–रामायण महाकाव्यें, पुराणें, महाकाव्य-नाटकें एवढ्यापुरतेंच मर्यादित न मानतां त्याचा अधिक व्यापक दृष्टीनें आपण विचार केला पाहिजे.

## मध्यवर्ती संस्कृत मंडळाचें कार्य

प्राच्यविद्यापरिषदेच्या अगदीं आरंभींच्या अधिवेशनापासून, प्राच्यविद्याविशारद अशी सारखी मागणी करीत आले आहेत कीं, भारतांत एक मध्यवर्ती संशोधन-संस्था ( Central Research Institute ) स्थापन झाली पाहिजे कीं, ज्या संस्थेच्या द्वारें जगांत सर्व ठिकाणीं प्राचीन भारतीय भाषा व वाङ्मय यासंबंधीं कोणतें संशोधन झालें आहे याची जिज्ञासू संशोधकांना माहिती मिळावी. अजूनहि ती मागणी पुरी झालेली नाहीं, व अशी मध्यवर्ती संशोधन-संस्था अजूनपर्यंत स्थापन झाली नाहीं. हल्लीं एक मध्यवर्ती संस्कृत-मंडळ ( Central Sanskrit Board ) काम करीत आहे. पण त्याचें कार्य, देशांतील संशोधनसंस्थांना आर्थिक मदत वाटून देणें, कांहीं ग्रंथांच्या प्रती विकत घेणें, आणि पाठशाळा, विद्यालयें व महाविद्यालयें यांना द्रव्यसाहाय्य करणें एवढ्यापुरतेंच मर्यादित आहे. तें मंडळ मध्यवर्ती संशोधन-संस्थेची उणीव, जशी पाहिजे तशी भरून काढू शकत नाहीं. हल्लींच्या मध्यवर्ती संस्कृत मंडळानें केवळ कारभारविषयक कार्यांतच व्यापृत असून चालणार नाहीं. त्याचा खरा उपयोग व्हावयाचा असेल तर त्यानें, ठिकठिकाणच्या संशोधनसंस्थांनीं कोणत्या पद्धतीनें व दिशेनें काम करावें, कोणत्या योजना हातीं घ्याव्या यांबद्दल त्या संस्थांना मार्गदर्शन करणें आवश्यक आहे. त्याचप्रमाणें ज्या योजनांना मंडळानें आर्थिक साहाय्य दिलें आहे, त्या योजनांची प्रगति योग्य रीतीनें होत आहे कीं नाहीं हेंहि मंडळानें वेळोवेळीं तपासून पहाणें जरूर आहे. हल्लीं देशांत प्राच्यविद्याविषयक संशोधनयोजना चालू आहेत. त्यांपैकीं कांहीं योजना विद्वानांना कांहीं काम मिळावें याच दिशेनें चालविल्या जात असून त्यामध्यें, कार्याच्या दृष्टीनें द्रव्याचा बराच अपव्यय होत असलेला आढळून येतो. बऱ्याच वेळां अशा योजना घाईनें हातीं घेतल्या जातात व योग्य तो तपशीलवार विचार केल्याशिवाय सुरू केल्या जातात. आपल्या देशाची साधन-सामग्री आधींच मर्यादित असल्यामुळें, योजना घाईनें करणें टाळलें पाहिजे. माझ्या मतें, हल्लींचें मध्यवर्ती संस्कृतमंडळ हें खास कायद्यानें नियुक्त केलेलें (Statutory) तज्ज्ञांचें मंडळ असावें; या मंडळानें नियमितपणें दर महिन्याला बैठक भरवून जे संशोधनविषयक कार्यक्रम त्याच्यापुढें आले असतील त्यांची कसून तपासणी करावी, त्यांत जरूर तर फरक सुचवावेत, कार्यकर्त्यांनीं कोणत्या अनुक्रमानें ते संशोधनविषयक कार्यक्रम पार पाडावेत यांविषयीं निश्चित मार्गदर्शन करावें आणि मगच आवश्यक ती आर्थिक मदत द्यावी. देशांत ठिकठिकाणीं अशा कांहीं संस्था असतील कीं, ज्यांच्याजवळ संशोधनविषयक योजना आहेत. अशा संस्थांना मंडळानें उत्तेजन द्यावें किंबहुना प्राच्यविद्यांचें अध्ययन अधिक चांगलें व्हावें अशा योजना मंडळानें स्वतः आंखून पार पाडाव्या. यांशिवाय, परंपरागत शास्त्रीपंडितांच्या शिक्षणपद्धतीस उत्तेजन द्यावें. पण त्याचबरोबर या शास्त्री-पंडितांनीं आधुनिक शास्त्रीय पद्धतींचा परिचय करून घेतला पाहिजे असा कटाक्ष ठेवावा. कारण शास्त्री-पंडित काळाच्या मागें राहून चालणार नाहीं. पूर्वीच्या जुन्या शास्त्रार्थ-चर्चापद्धतीवरच केवळ भर न देतां, त्या शास्त्रांत नवीन भर टाकायला त्यांना उद्युक्त केलें पाहिजे. तरच जुन्या शास्त्रांची प्रगति होऊं शकेल.

## अध्यक्षांची नियुक्ति

अखिल भारतीय प्राच्यविद्यापरिषदेचे हेतू व उद्दिष्टें त्याचप्रमाणें परिषदेच्या कक्षेंत येणारे विषय परिषदेच्या दुसऱ्या व चौथ्या अधिवेशनांत निश्चित केले गेले. ते हेतू व उद्दिष्टें त्याचप्रमाणें विषय इतक्या










व्यापक अधिष्ठानावर आधारलेले होते कीं, परिषदेच्या पुढील अधिवेशनांतून त्यांत फारच थोडा फरक करावा लागला. व्यक्तिशः माझें असें मत आहे कीं, प्रमुख ( General President ) अध्यक्ष त्याचप्रमाणें विभागांचे अध्यक्ष ( Sectional Presidents ) यांची निवड कार्यकारीमंडळाकडेच सोंपवावी. कार्यकारीमंडळानें त्या त्या विशिष्ट विषयांत खास नैपुण्य मिळविलेल्या विद्वानांनां त्या विशिष्ट विभागाच्या अध्यक्षपदासाठीं पाचारण करावें; ही नियुक्ति करतांना कार्यकारीमंडळानें असा उदार दृष्टिकोन ठेवावा कीं, ज्यायोगें तरुण रक्ताच्या संशोधकांना परिषदेच्या संघटनेमध्यें योग्य तें स्थान मिळून ते त्यांच्या कामाचा योग्य तो वांटा उचलूं शकतील. कार्यकारी मंडळानें अशा तऱ्हेनें अध्यक्षांची नियुक्ति केल्यास मतदानपद्धतीच्या निवडणुकांचें कारण रहाणार नाहीं. अशा निवडणुकांमुळें उगीचच जरूर नसतांना नसते मत्सर व हेवेदावे उत्पन्न होत असतात.

## कांहीं जुने दुर्मिळ ग्रंथ

मला आणखी कांहीं सूचना करावयाच्या आहेत त्या सरकारनें व प्राचीन ग्रंथ–संग्र हांच्या ग्राहकांनीं व विक्रेत्यांनीं लक्षांत घ्याव्या अशी माझी विनंति आहे. प्राच्यविद्यान्तर्गत विषयांवर पूर्वी प्रसिद्ध झालेले पुष्कळ जुने ग्रंथ आज दुर्मिळ झाले आहेत. त्यांच्या प्रती संपून गेल्या आहेत. पण त्यापैकीं कांहीं ग्रंथ असे आहेत कीं त्यांची संशोधकांना नेहमींच गरज लागणार. उदाहरणार्थ, एपिग्राफिआ इंडिका, कार्पस इन्स्क्रिप्शनम इंडिकेरम, ग्रिअरसन यांचा लिंग्विस्टिक सर्व्हे— या ग्रंथांच्या प्रती संशोधकांच्या नवीन पिढ्यांना, नवीन संस्थांच्या ग्रंथालयांना आज मिळूं शकत नाहींत. म्हणून तरुण संशोधकांना या ग्रंथांचें दर्शन देखील दुर्मिळ झालें आहे, मग त्यांचा उपयोग करणें तर दूरापास्तच ! प्राचीन ग्रंथ-संग्रहांच्या विक्रेत्यांनीं ह्या पुस्तकांच्या मागें लागून तीं असतील तेथून हुडकून काढलीं पाहिजेत, जर कोठें तीं अडगळींत, न वापरतां, पडलीं असतील तर तीं मिळवून त्यावर नाममात्र नफा घेऊन सार्वजनिक ग्रंथालयांना उपलब्ध करून दिलीं पाहिजेत. कोणत्याहि प्रश्नीं, सरकारनें यांत लक्ष घातलें पाहिजे. अशीं पुस्तकें संशोधकांच्या गरजा लक्षांत घेऊन तीं त्यांना पुरविण्याचे उपाय व साधनें शोधून काढणें सरकारचें कर्तव्य आहे.

प्राच्यविद्यापरिषदेच्या गेल्या अधिवेशनापासून आतांपर्यंत जे ग्रंथ प्रसिद्ध झाले असतील त्यांचें समालोचन करण्याचा माझा उद्देश नाहीं. कारण एक तर, गेल्यावर्षी अधिवेशन झाल्यामुळें मध्यंतरीचा काळ फार थोडा लोटला आहे. दुसरी गोष्ट म्हणजे निरनिराळ्या क्षेत्रांत प्रकाशित झालेल्या ग्रंथांचें समालोचन त्या त्या विभागांच्या अध्यक्षांनीं करणें अधिक उचित होय असें मी समजतों.

## वेदांचीं भाषांतरें

आणखी एक–दोन गोष्टींसंबंधीं मला आपलें लक्ष वेधावयाचें आहे. पहिली गोष्ट म्हणजे अशीं कांहीं कामें आहेत कीं त्यांत पुनरुक्ति होऊन त्यायोगें शक्ती व द्रव्य यांचा अपव्यय होतो. उदाहरणार्थ, वेदांसारख्या जुन्या ग्रंथांचीं कित्येक युरोपीय तसेंच आधुनिक भारतीय भाषांमधून भाषांतरें प्रसिद्ध करण्याच्या योजना आंखल्या जाऊन, त्याप्रमाणें कांहीं भाषांतरें प्रसिद्धहि झालीं आहेत. पुष्कळ पंडितांना, भाषांतर करतांना जुनी परंपरागत पद्धति व आधुनिक पद्धति दोन्हींहि माहीत नसतात; तरी देखील ते आपलेंच भाषांतर मुळाला धरून व खरें आहे असा दावा करतात. असें म्हणणें ही मोठी नाजूक गोष्ट आहे हें खरें. परंतु माझ्या मतें, जर एखाद्या ग्रंथाच्या वा ग्रंथभागांच्या दोन भाषांतरांतून एकच अर्थ निघत नसेल, तर त्यांतील एक भाषांतर किंवा दोन्हीहि भाषांतरें चुकीचीं असलीं पाहिजेत हें गृहीत धरावयास हरकत नसावी. कारण ग्रंथाचा अर्थ, मग त्याचा अनुवाद व अनुवादक कोणत्याहि भाषेचा असेना, एकच असला पाहिजे. या संदर्भात शंकराचार्यांचें वचन लक्षांत घेण्यासारखें आहे : त्यांनीं म्हटलें आहेः 'एकरूपेण अवस्थितो योऽर्थः, स परमार्थः ।'

## संशोधनाची पुनरावृत्ति !

आणखी एका गोष्टीबद्दल मला आपलें लक्ष वेधावेसें वाटते. ती गोष्ट अशी : विद्यापीठांतून हल्लीं पीएच्. डी. व डी. लिट् या पदव्या सरसहा सुरू झाल्या असून त्या पदव्यांकरितां संशोधनात्मक प्रबंध सादर करण्याची








आवश्यकता असते. पुष्कळ पदवीधर आपल्या प्राध्यापकांच्या मार्गदर्शनानें योग्य तो विषय निवडून या पदव्यांकरितां प्रबंध सादर करतात. परंतु जे विषय ते निवडतात त्या विषयांवर आधींच इतरत्र कोणा दुसऱ्या संशोधकानें प्रबंध लिहून पदवी मिळविलेली असते. तो छापून प्रसिद्ध न झाल्यामुळें असा प्रबंध त्या अमुक विषयावर झाला आहे हें लक्षांतहि येत नाहीं. त्यामुळें नवीन संशोधन न होतां, त्याच त्याच विषयावर त्याच त्याच प्रकारचे प्रबंध लिहिले जाऊन, द्विरुक्ति, त्रिरुक्ति–पुनरावृत्ति होत असते. भास, कालिदास, भवभूति इत्यादि अभिजात महाकवि यांचे ग्रंथ व पुराणें यांवर पीएच्. डी करितां लिहिल्या गेलेल्या प्रबंधांमध्यें अशी पुनरुक्ति किंवा पुनरावृत्ति आढळून येते; व कांही नवीन संशोधन न होतां संशोधकांच्या काळाचा व शक्तीचा अपव्यय होत असतो. वर सुच-विल्याप्रमाणें जर मध्यवर्ती संशोधनसंस्था अस्तित्वांत असती, तर तिच्या कार्यालयांत पीएच्. डी करितां निवडलेल्या विषयांवर लिहून पुरे झालेले असे जे प्रबंध त्यांची समग्र माहिती उपलब्ध झाली असती व त्या आधारें मध्यवर्ती संशोधनसंस्थेनें प्रबंधाकरितां विषय निवडणाऱ्या नवीन संशोधक विद्यार्थ्यांस मार्गदर्शन केलें असतें. ही विषयांबाबतची पुनरावृत्ति टाळण्याला एक उपाय आहे. अर्थात् तो संशोधकविद्यार्थ्याला खर्चाचा पडेल हें खरें. तो उपाय म्हणजे, युरोपमधील कांहीं विद्यापीठांतून चालूं असलेल्या प्रथेप्रमाणें संशोधक-विद्यार्थ्यानें आपला पीएच्. डी. करितां सादर करावयाचा प्रबंध छापूनच सादर करावा.

## प्राच्यविद्यापरिषदेनें दिलेली प्रेरणा

अखिल भारतीय प्राच्यविद्यापरिषदेच्या गेल्या २४ अधिवेशनांतून सुमारें ७००० संशोधनात्मक निबंध–प्रबंध सादर केले गेले व त्यांपैकीं पुष्कळसे चर्चिलेहि गेले. त्या निबंधांपैकीं बरेचसे निबंध परिषदेच्या वृत्त-निवेदन-पुस्तकां- (Proceedings) मधून छापलेहि गेले आहेत. कांहीं निबंध देशांतील संशोधनाला वाहि-लेल्या नियतकालिकांतून प्रसिद्धहि झाले आहेत. गेल्या सुमारें ५० वर्षांत जें हें संशोधनात्मक वाङ्मय बाहेर पडलें त्याला प्रेरणा देण्याचें श्रेय प्राच्यविद्यापरिषदेलाच देणें उचित होईल. परिषदेपुढें आलेल्या निबंधांपैकीं बहुतेकांची नांव–वार व लेखक–वार सूचि श्री. के. व्ही. शर्मा यांनीं संपादिलेली असून ती तीन खंडांत प्रसिद्ध झाली आहे. ज्याला प्राच्यविद्याक्षेत्रांत संशोधन कराव-याचें आहे, त्याला हे तीन सूचिखंड संदर्भग्रंथ म्हणून अत्यंत आवश्यक आहेत; त्यावरून त्याला पूर्वीं कोण-कोणत्या विषयावर काम काय व कसें झालें आहे, याची कल्पना येईल.

अ. भा. प्रा. विद्यापरिषदेनें गेल्या ५० वर्षांत जें कार्य केलें आहे तें अत्यंत आशाजनकच आहे असें कोणीहि सुज्ञ म्हणेल, यांत शंका नाहीं. या रौप्यमहो-त्सवी अधिवेशनप्रसंगीं, परिषदेच्या कार्याचा व्याप आणखी कसा वाढवावयाचा, त्यांतील निबंध व चर्चा यांचा दर्जा अधिक उंचावेल याकरितां काय करतां येणें शक्य आहे; त्याचप्रमाणें चालू काळाची नवीन आव्हानें व गरजा यांना अनुसरून आपल्या धोरणांत व कार्यक्रमांत काय बदल करायला पाहिजे, इत्यादि गोष्टींचा विचार होऊं शकला तर ते प्रसंगोचितच होईल.

## अध्यक्षीय भाषणांचा एकत्र संग्रह

माझा भाग्यवशात् योगायोग असा कीं माझ्यापूर्वी विष्णूच्या चोवीस अवतारासारखे किंवा जैनांच्या चोवीस तीर्थंकरासारखे प्राच्यविद्यापरिषदेचे चोवीस अध्यक्ष होऊन गेले आहेत. त्यांना मी माझे ‘पथिकृत्’ म्हणून अभिवादन करतो. अध्यक्षपद भूषविणाऱ्या या चोवीस अग्रगण्य विद्वानांनी आपल्या अध्यक्षीय भाषणांतून प्राच्यविद्याक्षेत्रांतील मूलभूत विषयांचा परामर्श घेतला आहे. या एकंदर २४ अध्यक्षांचीं चोवीस भाषणें वाचल्यावर असें वाटतें कीं, प्राच्यविद्याक्षेत्रांत काम करणाऱ्या संशोधकासमोर जे प्रश्न किंवा समस्या उभ्या रहातात, त्यांपैकीं असा एकहि प्रश्न किंवा समस्या शिल्लक राहिली नसेल कीं ज्याचा परामर्श या २४ अध्यक्षीय भाषणांतून कोठें ना कोठें तरी घेतलेला आढळणार नाहीं. माझ्या अध्यक्षीय भाषणाला पूर्वींच्या अध्यक्षांच्या भाषणाची सर येणार नाहीं याची मला जाणीव आहे. कारण ‘Lower Criticism’ (ग्रंथांतील पाठसंशोधन चिकित्सापूर्वक करून मूलपाठ ठरविण्याचें शास्त्र ) यासारख्या एका मर्यादित क्षेत्रांत मी काम करीत आलों आहे. परिषदेच्या अधिकाऱ्यांना








माझी कळकळीची विनंति आहे कीं त्यांनी परिषदेच्या गेल्या चोवीस अधिवेशनांच्या चोवीस प्रमुख अध्यक्षांचीं भाषणें एकत्र ग्रंथरूपानें छापून प्रसिद्ध करावींत; म्हणजे तरुण होतकरू संशोधकांस त्यांचा एकत्र अभ्यास करतां येईल व आपल्या संशोधनाला कोणता विषय निवडावा व तो प्रत्यक्ष कसा पार पाडावा या बाबतींत या अध्यक्षीय भाषणसंग्रहाचा त्यांना फायदा होईल.

## नवीन काळाचीं आव्हानें

शेवटीं मला पुन्हां एकदां आवर्जून सांगावेसें वाटतें कीं, आपल्या पूर्वजांनीं जो आपल्याला भव्य सांस्कृतिक ज्ञानाचा वारसा दिला आहे, त्याच्याबद्दल केवळ आदरभावच बाळगून न थांबतां, आपणहि ते ज्ञानधन समृद्ध करण्याकरतां परिश्रमपूर्वक अध्ययन-संशोधन करून त्यांत आपली-अल्पशी कां होईना भर टाकली पाहिजे. आपल्या पूर्वजांच्या कार्याचें नुसतें गुणगान करून आपण स्वस्थ बसतां कामा नये. आपण आधुनिक काळाच्या मागें राहून चालणार नाहीं. जुनीं दर्शन-शास्त्रें हीं आपापल्या परीनें अत्यंत महत्त्वाची व मूल्यवान् आहेत यांत शंका नाहीं. परंतु आधुनिक ज्ञानानें त्यांना मागें टाकलें आहे हें आपण विसरतां कामा नये. चन्द्रलोकाला जाणें किंवा चंद्रावर आपलें नांव कोरणें हें जें मानवाचें सुखस्वप्न तें आपल्या पूर्वजांनाहि पडलें होतें हें ' चन्द्रलोकं स गच्छति ' या पुराणान्तर्गत वचनावरून किंवा ' लिखितं नाम शशिनि ' या उक्तीवरून दिसून येतें. कांहीं विशिष्ट धर्माचरण करून चन्द्रलोकाला जातां येतें अशी आपल्या प्राचीन पूर्वजांची धारणा होती. परंतु प्रत्यक्ष चंद्रलोकावर जाणें जुन्या परंपरागत धर्माचरणानें साध्य होणारें नाहीं हें आज आपणांस प्रत्यक्ष दिसत आहे. चंद्रलोकावर जाऊन येण्याच्या पराक्रमाचें श्रेय अमेरिकन शास्त्रज्ञांनीं जी अभूतपूर्व शास्त्रीय तंत्र–विषयक प्रगति करून दाखविली, तिला आहे. २१ जुलै १९६९ या दिवशीं तीन अमेरिकन अंतराळवीर प्रत्यक्ष चंद्रलोकावर जाऊन उतरले, त्यांनीं चन्द्राच्या पृष्ठभागावर एक आपल्या नांवाचा कोरीव ताम्रपट बसवला आणि प्रत्यक्ष चन्द्रावरील पृष्ठभाग कोरून, खणून तेथील अनेक घमेली माती आणली. ते तीन महाभाग अंतराळवीर नुकतेच गेल्या २६ ऑक्टोबरला आपल्या भारताला भेट देऊन व स्वागत स्वीकारून गेले आहेत. असो.

आपण माझी या रौप्यमहोत्सवी अधिवेशनाच्या अध्यक्षपदीं नियुक्ति करून माझा जो गौरव केला आहे त्याबद्दल पुन्हां आपले सर्वांचे आभार मानतों.

---













रॅशनल आर्ट अ‍ॅन्ड प्रेस प्राइवेट लिमिटेड







अनुक्रमणिका

# वाचकांचा-पत्रव्यवहार

माननीय : संपादक यांना नमस्कार—

आपल्या लोकप्रिय 'नवभारत' मासिकाच्या जुलै १९६९ च्या अंकामध्ये श्री. भा. ग. सुर्वे यांचा 'भारतीय ग्रामदैवते' म्हणून एक लेख आलेला आहे. त्यात भारतातील निरनिराळ्या प्रदेशात असलेल्या वन्य जातीतील व अनेक समाजातील ग्राम-देवदेवतांचा उल्लेख आलेला आहे. पण भारतात प्राचीन काळापासून चालत आलेल्या व बलाढ्य अशा नंदवंशाचे मगध साम्राज्य धुळीस मिळविण्यास कारणीभूत झालेल्या सप्तमातृकांचा उल्लेख केलेला नाही. त्याची त्रुटी भरुन काढायला हे पत्र लिहीत आहे.

ज्या सप्तमातृकांच्या जोरावर चाणक्याने आपल्या कुटिल नीतीने सुनंदासारख्या भोळ्या व सच्छील तरुण कलावंताला माध्यम बनवून महानंदाचे मगधचे साम्राज्य जिंकून चंद्रगुप्ताला राजा केले. त्या सप्तमातृकांची नांवे येणेप्रमाणे आहेत.

त्या सात बहिणी होत्या असे मानतात : १. जयंती २. वैजयंती ३. तारा ४. राधा ५. कुहू ६. अरुधंती आणि ७. वाराही. या सात मातृकांची या काळी विलक्षण मातबरी होती. त्या काळातील त्या ग्राम-देवताच होत्या. त्यांच्यात तारक मारक शक्ति होती असे त्या काळातील लोक मानीत. त्यांची उपासना केल्यास रोगराई, परचक्र व गावावरचे संकट नाहीसे होते अशी समजूत होती. भाद्रपद व अश्विन महिन्यात या सात बहिणींचा मोठा उत्सव होत असे. त्यांचे स्वरूप ओबडधोबड असे पण ते अति सूक्ष्म जाणीव व्यक्त करणारे शिल्प असेल यात मात्र शंका नाही. अनेक ज्ञात आणि अज्ञात अशा व्यक्तींना त्यांनी स्फूर्ति दिली असेल.

श्री. भा. ग. सुर्वे यांनी उल्लेखिल्याप्रमाणे आजही विदर्भात नदीकाठी, विहिरीकाठी तळ्या काठी, खुल्या जागेवर किंवा काडी-मोडीचा मंडप घालून चौथरा करून त्यावर सात दगडांची प्रतिष्ठापना केलेली असते. त्यांचे स्वरूप ओबड-धोबड असते. त्यांना शेंदूर फासलेला असतो. हिंदु धर्मातील खालच्या जातीचे लोक त्यांची पूजा करतात. विशेषतः बाया, हळद, कुंकू अक्षता, फुले, ऊद अगरबत्ती वाहून दहीभाताचा नैवेद्य अर्पण करतात. नारळ, बांगड्या, खण, आरसे झवले, अशासारख्या वस्तूंनी तिची ओटी भरतात. माझ्या कयासाप्रमाणे ह्याच त्या सप्तमातृका होत, ज्यांना विदर्भवासी 'आसरा' म्हणून संबोधतात. आणि सप्तमातृका ह्या शब्दाचा **आसरा** हा अपभ्रंश असावा असे मला वाटते.

आपण ऐतिहासिक सत्य पडताळून पाहिले तर नंदवंशाचा उच्छेद करण्याकरिता सुनंदाने निर्माण केलेल्या सुवर्णधातूच्या सप्तमातृकांपैकी जयंतीच्या तोंडावळ्यासारखी तोंडावळा घेऊन आलेली राज-नर्तकी मधुरिका हिच्या अमूर्त पण जबरदस्त ओढीमुळे सुनंदाला मधुरिकेबरोबर पाटलीपुत्राला लग्नाकरिता राजाज्ञा घेण्यासाठी जावे लागले. कारण मधुरिका आई होणार होती.

या अद्वितीय शिल्पाच्या प्रतिष्ठापनेच्या दिवशी रात्रीला नंदराजाच्या सातही राजकुमारांची प्रेते मातृकांच्या पोकळीत भरली होती. मातृकांच्या पाठीच्या पोकळीत बसून कळ दावून या शस्त्राच्या घावाने राजकुमारांचे प्राण मोठ्या कौशल्याने घेऊन ती प्रेते त्यातच लपवून ठेवली असावी हे उघड आहे.

सुनंदाला मधुरिकेने संकटाची जाणीव करून दिल्यावर सुनंदा भिक्षुवेश परिधान करून राजधानी-बाहेर पडला पण दुर्दैव हात धुवून त्याचे पाठीमागे लागले होते. एक भयंकर रागावलेला हत्ती सुनंदाला ठार मारण्याच्या हेतूने त्याचा पाठलाग करीत होता. त्यावर यमदूताप्रमाणे भासणारा एक मनुष्य बसला होता. सुनंदाने जीव वाचविण्याकरिता विहिरीत उडी घेतली पण त्याच्याच हातांनी बनविलेल्या मातृकांच्या छिन्नविच्छिन्न तुकड्यांनी सुनंदाची पाठ कापून निघाली व रक्तबंबाळ झाली. साप चावून विहिरी-तच त्याचा हृदयद्रावक अंत झाला.

मधुरिकेला मुलगा झाला त्याचे नांव शतानंद. तो अगदी बापासारखा उपजत कलावंत. नर्मदातटी असलेल्या चौसष्ट योगिनींच्या देवालयातील शिल्प त्याच्याच कल्पनेतून स्फुरले. त्याच्या व त्याच्या शिष्यगणाच्या हातून ते साकार झाले. आजन्म तोच शतानंदाचा ध्यास होता. या योगिनींच्या








पहिल्या मूर्तीची पूर्णता झालेली पाहून वृद्ध मधुरिकेने समाधानाने देह ठेवला.

सुनंदाने निर्माण केलेल्या, नंदघराण्याच्या नाशास कारणीभूत झालेल्या व शेवटी सुनंदाच्या अंतास साहाय्यक असणाऱ्या सप्तमातृकांचा अल्पसा परिचय येथे केलेला आहे. त्या काळच्या जनजीवनांत त्यांचे अढळ स्थान होते यात शंका नाही. इतिहासाच्या अज्ञात अशा पृष्ठावर त्यांचे काय स्थान होते हे मला माहीत नाही. पण या मातृकांचे अस्तित्व अद्यापही कायम आहे. आणि जोपर्यंत हिंदू धर्म व हिंदू समाज कायम आहे तोपर्यंत ते स्थान अढळ राहील.

–श्री. म. म. वाघमारे

# प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

| | | |
|---|---|---|
| (१) धर्मकोश– व्यवहारकाण्ड भाग १ ते ३ | | किंमत |
| | साधी बांधणी ... ... ... | ८०·०० |
| | कापडी बांधणी ... ... ... | १०४·०० |
| (२) धर्मकोश - उपनिषत्काण्ड भाग १ ते ४ | | |
| | साधी बांधणी ... ... ... | १५०·०० |
| | कापडी बांधणी ... ... ... | १८२·०० |
| (३) धर्मकोश– संस्कारकाण्ड भाग १ ला .... | | ४५·०० |
| | कापडी बांधणी ... .... ... | ६३·०० |
| (४) मीमांसादर्शन ... ... ... ... | | ३०·०० |
| (५) मीमांसाकोश ... भाग १ ते ७ (संपूर्ण) | | २५०·०० |
| (६) कौषीतकिब्राह्मणारण्यकविषयकोश ... ... | | ६·०० |
| (७) बौद्धागमार्थसंग्रहः .... ... ... | | २०·०० |
| (८) नवमानवतावाद ... ... ... | | २·५० |
| (९) मानवाचा आदर्श ... ... ... ... | | ३·०० |
| (१०) चार्वाक– इतिहास आणि तत्त्वज्ञान | | |
| | (प्रा. सदाशिव आठवले) ... | ३·०० |
| (११) गीता-प्रवेश (डॉ. गो. वि. देवस्थळी) ... | | २·५० |
| (१२) महाराष्ट्रांतील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना | | |
| | (श्री. चा. अ. दाभोलकर) .... | २·०० |
| (१३) सिंधु संस्कृती, ऋग्वेद व हिंदु संस्कृती (प्र. रा. देशमुख) | | ४·०० |
| (१४) इतिहासाचे तत्त्वज्ञान (प्रा. सदाशिव आठवले) | | ६·०० |
| (१५) लोकशाहीचे धोके (श्री. पन्नालाल सुराणा) ... | | २·०० |
| (१६) भारतीय स्त्रीधर्माचा आदर्श (सौ. कमल पाध्ये) | | २·०० |

